# कथानुक्रम

## तोंड ओळख

कोण्या एके काळीं या महाराष्ट्र देशांत अशी भुमका उठली कीं कथा-वाङ्मय अगदींच शहरी झाल्यामुळें त्याची प्रकृति खालावली आहे, सबब त्याला खेड्यापाड्याची गुणकारी हवा दाखवली पाहिजे. रुचिपालटीसाठीं हपापलेल्या वाचकांइतकेच तें गंधून कंटाळलेल्या लेखकांनाहि हें नवें अनुपान ऐकतांच पटलें. मुंबईपुण्याबाहेर महाराष्ट्रांत वस्ती आहे याचा सुगावा लागला आणि वस्तीप्रमाणें प्रकृति बदलणें शक्य आहे याचा चुकतमाकत अंदाज आला. नाहींतर, केवळ भौगोलिक अर्थानें सावंतवाडींत जरी गोष्ट घडली तरी तेथील नायक बोलतांना पुणेंकरासारखा आणि प्रेम करतांना मुंबईकरासारखा असावयाचा. या खोड्यांतून मराठी कथा बाहेर पडत आहे या वार्तेनें तेव्हां आशा पालवली. पण झालें भलतेंच. ती कथा गांवोगांव फिरतीवर निघाली खरी, पण आपल्या जुन्या खोड्यासकट, फरफटत आणि त्यामुळें अधिक पांगळी बनून. तींच पात्रें, तेंच प्रेम. फक्त मागील पडदा बदलला. कोचखुर्च्या आणि लतांकुज यांऐवजीं नदीघाट, आणि शाळू, यांचा प्रेमाला आधार आणि आडोसा मिळाला. पात्रांच्या मेकअप बरोबर नांवेंहि बदललीं. पण मधुकरचा म्हादू आणि शारदेची सारजा होऊन तुळतुळीत भांगावर मुंडासें आलें अथवा कुंकवाचा व्याप वाढला तरी त्याआडची करणी तीच राहिली. या नव्या सोंगाला ग्रामीण असें भारदस्त नांवहि लगोलग मिळालें. संस्कृत नांवनिशी उकरून काढणें हा आपल्या रिकामटेकड्या विद्वत्तेचा आवडता चाळा आहे. तें नांव फैलावलें आणि त्याला शोभेशा कथांची मासिक पैदास चालू झाली. कांहीं भाबडे आणि कांहीं मतलबी कवीहि या गांवरान उद्योगांत सामील झाले. परिणामीं वाङ्मयक्षेत्रांत हें तण फार माजलें.

मुदैवानें तें इतकें माजलें कीं समज आलेल्या वाचकांना तें डोळ्यांपुढें नकोसें झालें.

दुर्दैवानें ज्यांच्याविषयीं हें साहित्य लिहिलें जात होतें, त्यांना वाचतां येत नव्हतें किंवा आल्यास साहित्य वाचण्याची संवय अथवा सवड त्यांना नव्हती. तें त्यांनीं वाचलें असतें तर लिहिणाऱ्यांची धडगत नव्हती. हें जाणूनच त्या लेखकांनीं वाचकांच्या एका जातीवर नजर ठेवून लिहिलें. ती जात म्हणजे लहानमोठ्या शहरांतील मध्यमवर्ग. तोहि पुरा नव्हे. उच्च शिक्षण ज्यांनीं घेतलें, व ज्यांच्याबाबत तें व्यर्थ गेलें नाहीं असा अगदीं वरचा पातळ थर त्यांनीं वगळला. आर्थिक अंगानेंहि पाहातां त्यांतल्या त्यांत संपन्न असा एक वरचा पापुद्रा आहे पण त्याला साहित्याचें सोयरसुतक नसतें. एकूण, बेताचेंच, आणि केवळ परीक्षार्थी, शिक्षण अंगावरून गेलेला, जमाखर्चाच्या विवंचनांनीं आणि संभावितपणाच्या कांचाखालीं खुरटल्यासारखा वागणारा, त्यांतहि कच्च्या वयाचा आणि विशेषतः स्त्रीलिंगी, वाचक अशा साहित्याला खास मानवला. खेड्यांतील जीवन फार सुंदर असतें ही भाकडकथा फार वेळां ऐकल्यामुळें या वाचकाला खरी वाटत असते. ' खेड्याकडे चला ' या आरोळींतील शाळकरी देशाभिमानाचा सूरहि पोरवयांत त्याच्यांत भिनलेला असतो. खुद्द त्याचें जीवन निःसत्त्व, बेचव आणि रंगहीन असल्यामुळें खेड्यांविषयींची ती थाप त्याला फार रुचली. नव्हे, तिचा केवढा विसावा वाटला. सुटीसाठीं जायला खेडें उरलें नसलें तरी मित्रमंडळीच्या घोळक्यांत ' ट्रिप् 'साठीं गेल्यावर कसलेंहि गांवढें गोड वाटतें. त्या होषांत कांटे कुरवाळतात आणि गवत चघळावेसें वाटूं लागते. दोन दिवस हात सैल असतो म्हणून त्यांत हवें तें विनासायास येतें. या ' वनभोजनी ' वृत्तीला गुदगुल्या करणारें ' ग्रामीण ' साहित्य धंदा म्हणून यशस्वी ठरलें. सर्वसाधारण ललित

साहित्याची प्रकृतीहि त्याहून वेगळी नव्हती.

त्या ललित पंथाचे प्रमुख आचार्य प्रा. नारायण सीताराम फडके. दीडदोन वर्षांपूर्वीच नवकथेची निर्भर्त्सना करतांना "वास्तवतेचा अवास्तव छंद" वाईट असा त्यांनीं इशारा दिला. पाहिलें तें कोणीहि लिहिल; नसेल तें कागदावर निर्माण करण्यांत कलेची शहामत अशी त्यांची श्रद्धा. त्या निर्धारानें त्यांनीं लिहिलें. खरें म्हणजे 'शहरी' कथांविरुद्ध कुई उठली ती फडक्यांच्या पहिल्या कादंबऱ्या यशस्वी झाल्यानंतर, किंवा झाल्यामुळें. पण त्यांतून निराळा मार्ग आपण हुडकला असा कांगावा करीत 'ग्रामीण' अथवा 'राजकीय' कादंबऱ्या लिहिणारे लेखक फडक्यांभोंवतींच प्रदक्षिणा घालीत राहिले. खुद्द फडक्यांनींहि अशाच गिरक्या घेऊन आपलें आसन घट्ट केलें. त्यांचेच मंत्र-तंत्र कानामात्रांच्या चलाख फरकानें इतरांनींहि वापरले. गुळगुळीत प्रेमाला मोटर किंवा आगगाडीचा दुसरा वर्ग यांऐवजीं खटाऱ्याचें वाहन दिलें. बंगल्याची चित्रांसारखी झोंपडी केली. 'राजकीय' म्हटल्या जाणाऱ्या कादंबरीकारांनींहि असाच साज मिळवून घेतला.

आपलीं खेडीं उजाड झालीं आहेत; दारिद्र्यानें काळवंडलीं आहेत. मूळच्या माणुसकीवर शेवाळ चढून दुरावे आणि दुस्वास चिघळले. या वाताहातींत विरोधानें कोठें गुणसौंदर्य चमकलें तरी त्यानें चित्राचा भकासपणा अधिकच वाढतो. पण आपल्या साहित्यांतील ग्रामीण हिशेबानें तेथें आबादी-आबाद आहे. सर्वत्र गोकुळ आहे. ओल्या सुक्या दुष्काळानें कोंकण आणि देशावरील जिल्हे वाळून जात असले तरी आमच्या या रंगीत चित्रांतील नायिका आणि गाई पुष्टच असणार. खेड्यांतील स्त्रिया जनावरासारखे कष्ट उपसत खचून जात असल्या तरी त्यांचें दळणकांडण, धुणी-भांडीं करणें आणि नदीवरून पाणी वाहून आणणें यांत काव्य आहे, हा बावळट समज आम्ही अजून उराशीं बाळगला आहे, सुष्टदुष्टांचे

नेहमींचे सोपे 'फॉर्म्युले' वापरले, पण खेड्यांना सुरांचा पुरवठा अधिक केला. बोलण्यांतील भावच नव्हे तर घाटहीं पांढरपेशा ठेवून माफक वास्तवता म्हणून 'पिरत'सारखे चारदोन निरुपद्रवी 'ग्रामीण' शब्द त्यांत टाकले. आपल्या पुस्तकी भाषेंतील शब्दांचींच अशुद्ध रूपें म्हणजे खेडवळ भाषा असें झालें. वस्तुतः प्रामाणिक खेडवळ तुमची आमची फिकट भाषा न बोलतां दणकट भाषा बोलतो आणि ठायींठायीं विराम चिन्हासारख्या शिव्या टाकतो, पण ग्राम्य आणि ग्रामीण यांची आपण गल्लत होऊं दिली नाहीं. राहावलेंच नाहीं तर सूचक फुल्या वापराव्या! असें आपलें साहित्य केवळ नांवेंगांवें आणि भाषेच्या चार लकबी एवढ्यापुरतेंच ठोकळमानानें 'ग्रामीण' होतें.

'प्रादेशिक कथा' ही त्याचींच पुढची पायरी. 'ग्रामीण' कथा महाराष्ट्रांतील [ किंवा मंगळावरील ] कोणत्याही खेड्याला लागू पडणारी ही अनिश्चितता टाळण्यासाठीं विशिष्ट प्रदेशाबाबतच्या कथा लिहिण्याच पायंडा पडला. उपक्रम स्तुत्य होता, पण परिणामीं तो एकंदरीनें उपद्रवकारक ठरला. कोणी कोंकणाविषयीं खोट्या कथा लिहिल्या, कोणी गोव्याविषयीं साधारणतः कृति वर दिलेलीच, फक्त त्यांत आंबे, माड, काजू अथवा देवचार असला कोंकणी मसाला टाकावयाचा, किंवा वाफोर, कुळागर, भावीण असला गोमंतकी गरम मसाला टाकावयाचा, कधीं 'श्रेष्ट धारिष्ट' दाखवून मासळी अथवा दारू यांचा वास द्यावयाचा. अशा प्रादेशिक कथांतील मोठा धोका हा कीं त्या प्रदेशाबाहेरच्या वाचकांना त्या सोंगाड्या आहेत हें उमगत नाहीं. गोव्याची सर्वांत अधिक बदनामी तेथील कांहीं कथाकारांनीं केली! गोवा हा एक सोज्वळ कुंटणखाना आहे असा लौकिक त्यांनीं आपल्या भूमीला मिळवून दिला. कोंकणाविषयींहि हळव्या आणि रडव्या कथा लिहून कांहीं दुबळ्या लेखकांनीं त्या कंगाल आणि कडवटलेल्या प्रदेशाला अन्याय केला. काल-

परवांपर्यंत ही अवस्था होती. अपवाद असले तर ते थोडे. मामा वरेरकर हे त्यांतील एक. त्यांनीं मालवणी लोकांना, विशेषतः स्त्रियांना आपली धार दिली.

पण आतां रंग बदलत आहे. मराठी कथेंत नवीन बळ आलें आहे. कारण केवळ वरवरच्या कसबांत गुंतून न पडतां अनुभवाच्या गाभ्याला ती हात घालूं पाहात आहे. जीवनाशीं इमान राखण्याचा तिचा आटोकाट प्रयत्न चालू आहे. म्हणून श्री. ना. पेंडसे यांनीं आपल्या तीन कादंबऱ्यांत उत्तर कोंकणचा एक छोटा तुकडा जिवंतपणें उभा केला. दक्षिण महाराष्ट्राचे विशेषतः माणदेशचे असें भाग्य उजळलें तें माडगूळकर बंधूमुळें. पण देश—कोंकण, शहर—खेडेंगांव असल्या कोंदट कप्प्यांत ही नवीन कथा सामावलेली नाहीं. पु. भा. भावे, अरविंद गोखले, गंगाधर गाडगीळ इत्यादींनीं मुंबई—पुणें—नागपूर यांविषयीं लिहिलें पण ते एकसांची अथवा पोषाखीपणानें नाहीं. माडगूळकर बंधूंनीं कळकट गांवांचीं चित्रें काढलीं तीं जिवंत अनुभवाचे टवटवीत रंग देऊन. भूगोलच्या मानीव रेषांनीं या कथाकारांचीं शब्दचित्रें बांधलेलीं नाहींत. त्यांतील माणुसकी सर्वस्पर्शी आहे.

श्री. ग. दि. माडगूळकरांना गेल्या पांच सात वर्षांत दृष्ट लागण्यासारखी कीर्ति लाभली, ती मुख्यतः कवि आणि पटकथाकार म्हणून. चित्रपटासाठीं हुकमी कविता लिहूनहि त्यांचीं ‘ पदें ’ न होऊं देणारा हा जातिवंत कवि. पण त्याची आणखीहि भरपूर कविता आह. त्यांतील कांहीं बेचाळीसच्या चळवळींत हजारों तोंडांत खेळत होती. या कणखर शाहिरीबरोबर त्यांनीं नाजूक कविताहि लिहिली. असा मूळचा पिंड कवीचा. पण इतर कांहीं आधुनिक कवींप्रमाणें माडगळकरहि लघुकथेकडे वळले. त्यांनीं लघुकथा फार थोड्या लिहिल्या. पण त्या अशा कीं ‘ इतक्याच कां ? ’ अशा प्रश्न मनांत उभा राहावा. अनक

अवधानें सांभाळीत पटकथा बांधणाऱ्या लेखकाला लघुकथेची एकाग्रता बिकट वाटावी. पण मला वाटतें, माडगूळकरांतील कवीनें ती सुकर केली असावी.

'सिनेमांतला माणूस' आणि 'मावशी परत आल्या, पण' यांतील मी म्हणजे स्वतः माडगूळकरच. त्यांच्या बंधूंनींही आपण व आपलें कुटुंबीय याविषयीं मोकळेपणानें पण अलिप्तपणानें कथा लिहिल्या आहेत. लहानपणच्या अपेष्टा सांगितल्या तरी त्यांत नाटकीपणा नाहीं. त्या खडतर दिवसांनीं या कलावंतांना तीक्ष्णता दिली. सुखवस्तू कुटुंबाच्या कोंडवाड्यांत मुलांची ग्रहणशक्ति अधु होण्याचा धोका असतो. त्यापासून बचावलेल्या या बंधूंनीं विविध अनुभव गांठीं बांधले. त्यांचा ताजेपणा हरवूं दिला नाहीं. शिक्षण फारसें झालें नाहीं. हेंहि कदाचित् त्या ताजेपणाच्या पथ्यावर पडलें असावें. शिक्षण, विशेषतः पदवी, आणि लेखन यांचें आपलें त्रैराशिक फार सोपें म्हणून अनेक वेळां खोटें ठरलें आहे. पाव डझन वरिष्ठ पदव्या वाहणाऱ्यांनीं गचाळ लेखन केलें आहे, आणि शाळेशींहि ज्यांनीं फारशी घसट ठेवलेली नाहीं अशांनीं अति सुंदर लिहिलें. आपलें परपुष्ट साहित्य पाहातां माडगूळकरांना इंग्रजीचा विशेष संपर्क लागला नाहीं हें भाग्य असें म्हणावें लागतें. नाहींतर कळत न कळत उसनवारी करण्यांत त्यांची लेखणी अर्धी झिजली असती. एच्. ई. बेट्स् काय म्हणतो हें ठाऊक नसल्यामुळें माडगूळकरांच्या लघुकथा शंभर टक्के माडगूळकरी झाल्या आहेत.

या आठ कथांतील एकहि सुखान्त नाहीं. कालच्या 'ग्रामीण' कथांचा शेवट सहसा इतर गोडगोड कथांप्रमाणें. 'प्रणयपूर्तींत' (म्हणजे फक्त विवाहांत!) होत असे; सगळे संशय फिटत असत. 'सिनेमांतील माणूस' असूनहि माडगूळकरांनीं धंद्यांतील परिस्थिति, तेथें लादीत असलेला गुळचटपणा

या कथांबाहेर ठेवला. " सद्या हेकणे " ही " सिनेमाची गोष्ट " असें टीपेंत सांगून जणूं लेखकानें तिचा नूर कांहींसा कचकड्याचा आहे अशी कबुलीच दिली आहे. पण चित्रपटसृष्टीचें एक सूक्ष्म देणेंहि या सर्व कथांत आहे. यांतील घटना, माणसें आणि, पार्श्वभूमि यांचा परस्पर-मेळ साधून लेखक जणूं रेखीवपणें प्रथम मनश्चित्रांत पाहतो आणि मग तें कागदावर उतरवितो. म्हणून वर्णनाचा सैलपणा नाहीं आणि पात्रांच्या आकृति स्पष्ट आहेत. माडगूळकरांसारख्या कलावंताला हें मूळचेंच देणें असतें. पण चित्रपट-शिल्पाच्या अनुभवानें त्याला बारकाई आणि निश्चितता येते.

हें पुस्तकाचें परीक्षण नाहीं, पण सहज डोळ्यांत भरणारे आणखी दोन तीन विशेष सांगावयास हवेत. या कथांपैकीं एकहि रूढ अर्थानें "प्रेम-कथा' नाहीं. यांतील वेगळेपणा व संयम अर्थपूर्ण आहेतच पण 'वीज' मध्यें आपल्या नेहमींच्या कथांतील फिकट आणि शिष्टमान्य प्रेमाहून निराळा असा नैसर्गिक पण जाळणारा विकार हलक्या हातानें आणि गाढ सहानुभूतीनें चितारला आहे त्यांची 'विनोदी गोष्ट' कोणीहि केली असती. तशाच 'मोती' वगैरे वेगळ्याच ढंगाच्या कथा. आणि या सर्व कथा इतक्या रसरशीत-पणें लिहिलेल्या असूनहि "शैली" ची नखरेल जाणीव कोठें खटकत नाहीं. गेल्या पिढीचें अर्ध्याहून अधिक साहित्य 'शैलीनें' गारद केलें आहे, हें ध्यानांत घेतां माडगूळकरांसारख्या नव्या लेखकांची साहित्याला वांचविण्याची ही धडपड पाहून आनंद वाटतो. अशी अनेक आशा-स्थानें या 'लपलेल्या ओघांत' आहेत. आणि हा ओघहि बुजरेपणानें लपून न राहतां अधिकाधिक खळाळेल अशी आशा वाटते.

बोरीवली, मुंबई,
२३ जून १९५२.

**— मंगेश विठ्ठल राजाध्यक्ष**

## ओलावा

लिहिलेलें लिखाण एकत्र करून दोन मलपृष्ठांच्यामध्यें बांधून छापून प्रसिद्ध केल्यावांचून लिहिणारा 'लेखक' होत नाहीं. ग्रंथकर्ता ठरत नाहीं. टीकाकार त्याच्या प्रतिभेची प्रकृत्ति तपासूं शकत नाहीं. रसिकांची अवस्थाही 'हस्ती पाहो गेलेल्या' आंधळ्यांसारखी होते. हें सारें माहित असूनही गेल्या बारा वर्षांत मी गोष्टी कविता वा चित्रकथा कशाचाच संग्रह केला नाहीं.

'अशाश्वत संग्रह कोण करी' हें पालुपदच माझ्या वेड्यांवाकड्या लेखन गीताला चांगलें जमत होतें. माझीं कांहीं गीतें छापलीं गेलीं तो केवळ अपघात. १९४३ सालीं एक नाटकही छापलें होतें पण आतां दिवा घेऊन शोधलें तरच तें 'पायरस्त्या' वरच्या ढिगाऱ्यांत मिळायचें!

चित्रपट व्यवसायांतील माझे उत्साही सहकारी श्री. ग. रा. कामत यांनीं चंग बांधला. माझ्या लघुकथा धुंडून काढल्या आणि प्रकाशकांच्या स्वाधीनही करून टाकल्या. प्रकाशकांनीं त्या भराभर छापून काढल्या आणि माझा नाइलाज झाला.

'पुस्तक' निघतेंच आहे तर त्यांत पुस्तकासारखें कांहीं असावें असा विचार करून आम्ही प्रा. मं. वि. राजाध्यक्ष यांना प्रस्तावना लिहिण्याची विनंती केली आणि त्यांनीं ती हौसेनें मान्य केली. इंग्रजी सातवी इयत्ता देखील नापास झालेल्या लेखकाच्या पुस्तकाला इंग्रजीच्या प्राध्यापकाची प्रस्तावना हा प्रकार 'साहित्यक' जमातीला अघटित वाटेल. राजाध्यक्षांना तसें वाटलें नाहीं. त्यांच्या उदारपणाची संभावना ऋण, आभार असल्या गुळगुळीत नाण्यांनीं होणार नाहीं याची मला जाण आहे.

कामतांचेहि आभार मी मानीत नाहीं. त्यांच्या मित्रत्वाचा मी सदैव अभिमान बाळगीत आलों आहे आणि तो बाळगावा इतके ते निरपेक्ष आणि शुद्ध आहे. माझ्या जिवंतपणींच माझें लिखाण शोधून काढण्याचें सायास त्यांना पडलें याबद्दल मात्र मी 'दोषी' आहे, अपराधी आहे.

कुलकर्ण्यांनीं पुस्तक त्वरेनें व चांगलें छापलें. त्यांना धन्यवाद. पोटाच्या व्यवसायांत मुद्रितें पाहण्याइतका अवसर मला अगर कामतांनाही राहिला नाहीं. लपलेला ओघ पाहूं जातां वाचकांना ठेंचा लागणें अपरिहार्य आहे. क्षमस्व!

— ग. दि. माडगूळकर

## बीज

१

आमच्या गांवचा तात्या गुरव मुलखांचा पिसारी. एवढ्यातेवढ्यानें तावडतोब चिडायचा आणि जानवें तोडून लिंबाजीबुवा व्हायचा. तिरसट माणसाला 'तात्या गुरव' म्हणायची पद्धत अजूनहि आमच्या गांवांत आहे. तात्याला मरून बरींच वर्षे झालीं, पण गांवांत त्याचें नांव राहिलें आहे.

तेव्हां तो जिवंत होता. मारुतीच्या देवळापासून शंभर कदमावर त्याचें दोन आंकण्यांचें माळवदी घर होतें. कुटुंबांत माणसें इनमीन तीन. तात्या, त्याची बायको गीता आणि मुलगा तुकाराम. तात्या मारुतीला पाणी घाली. कण्हेरी–रुईचीं फुलें वाही. रात्रीं गाभाऱ्यांत दिवा लावी. दिवसभर गांवकऱ्यासाठीं पळसाच्या, वडाच्या पानांच्या पत्रावळी लावीत बसे. गीता देवळाचा सोपा दर शनिवारीं सारवून काढी. गांवांत हव्य-कव्य असेल त्याच्या घरीं पत्रावळी नेऊन पोंचवी. मारुतीपुढें ठेवलेले पैसे, तांदूळ जमा करून आणी. आणि आपला फाटका प्रपंच समाधानानें चालवी. सकाळीं गांवांत बेल-तुळशी वांटायचें काम मात्र तुकारामाकडे असे. तो सकाळीं दिवस उगवायला आंघोळ करून बाहेर पडे. गांवांत शे-सव्वाशें उंबरा, तेवढा फिरे. फुलातुळशीचा पुडा दारांत फेकी. मायबहिणी त्याला बुचकुलीभर पीठ घालीत. पिठाची टोपली नऊच्या आंत घरीं येई. त्याच पिठाच्या भाकरी गीता थापी. प्रपंच हा असा चालला होता.

कुणाच्या अध्यांत नाहीं, मध्यांत नाहीं असें कुटुंब होतें. स्वतःच्या हातांत चिपाडाची सडी रुतली एवढ्या निमित्तानें का होईना, पण तात्या मात्र दिवसांतून शंभरदा चिडे, तुक्या-गीताला धपाटे घाली पण ती गोष्ट त्या दोघांच्या आणि साऱ्या गावांच्याही सरावाची झाली होती. तो एक नित्याच्या प्रकार होता. त्यांत कुणाला कांहीं विशेष वाटत नव्हतें.

तुक्या अठरा वर्षांचा झाला होता तरी त्याला ' ग-म-भ-न ' देखील ठाऊक नव्हतें. बेलाच्या झाडावर चढणें, कांटे चुकवून त्रिदळ तेवढाच बेल खुडणें एवढें कसबच काय तें त्यानें उभ्या आयुष्यांत आत्मसात् केलें होतें. एकदां दोनदां गांवांतल्या कृष्णामास्तराच्या शाळेंत तो गेला होता. तिथें पोरांनीं त्याची भारी टर केली होती. तेव्हांपासून शाळेचाच तेवढा उंबरा त्याच्या पायाला कधींहि लागत नसे. तात्यानेंहि त्या बाबतींत त्याला कांहीं सांगितलें नाहीं कारण त्याच्याहि आयुष्यांत शाळा आणि शिक्षण हा प्रकार संभवला नव्हता.

दुपार नुसती जळत होती. खंडोबाच्या माळावरच्या चिमखड्यांच्या फुलून लाह्या होतील इतकें ऊन तावत होतें. नेत्री–बोराड्यांच्या फांद्या चित्रासारख्या स्तब्ध होत्या. बघतांच डोळयाला अंधारी येऊन उन्हांत चित्रविचित्र रंगाच्या उलट्यापालट्या रेघोट्या सरपटत होत्या. सारा माळ निर्मनुष्य भकास होता. खंडोबाच्या देवळाच्या पडक्या भिंतीला टीचभर सांवलींत देवाचा रेडा अंग दाटून बसला होता–बाकी सारा शुकशुकाट. तापलेले खडे आणि माती तुडवीत दूरवरून तुकाराम येत होता. त्याच्या पायांत कांहींच नव्हतें. माथ्यावर पळसाच्या पानांनीं भरलेला एक मोठा हारा होता. एखाद्या थकलेल्या जनावरासारखा मोठमोठ्यानें उच्छ्वास टाकीत तो गांवाकडे येत होता. त्याच्या पाठीवर चांगलें दोन कलिंगडांएवढें आवाळूं होतें व छातीवरहि तसाच भोपळयाच्या आकाराचा मांसाचा गोळा हीं अनावश्यक उपांगें परमेश्वरानें त्याला कां दिलीं होतीं कोण जाणें. तुक्या चालूं लागला म्हणजे नेहमींच दबल्यासारखा चाले. अठरा वर्षांच्या वयांतहि त्याची उंची चार फुटांवर चढलेली नव्हती. तीं ओंगळ आवाळें तापलीं म्हणजे त्याचे प्राण कासावीस होत. आजच्या उन्हांच्या माऱ्यांत

तो नाइलाजानें सापडला होता. पाटलांच्या घरीं सत्यनारायण होता. आणि रात्रीं शंभर पान उठणार होतें. तात्या गुरव शेरडी घेऊन बाजाराला गेला होता. पाटलांची मागणी पुरवण्याचें काम अर्थातूच गीता आणि तुक्या यांच्यावर पडलें होतें. घरांत पळसाचें एक पानदेखील शिल्लक नव्हतें. दूर पांच मैलांवर कांटेवनांत पळसाचीं झाडें होतीं. तिथून पानें आणण्यासाठीं गीतानेंच तुक्याला धाडला होता. मोठ्या कष्टासायासानें तुक्या पावलें उचलीत होता. कधीं एकदां घर येतें असें त्याला होऊन गेलें होतें. माथ्यावरचा हारा फेकून देऊन खंडोबाच्या टाक्यांत गार आंघोळ करावी असें तुक्याच्या मनांत आलें. त्याचे पाय कापूं लागले होते. तोंडाला फेसाटी आली होती. उरापोटावरचीं आवाळें तडतडूं लागलीं होतीं. पण तो थांबला नाहीं. घरीं जायला उशीर झाला तर गीता हरणकाळजी करीत बसेल, पत्रावळी वेळेंत तयार होणार नाहींत, पाटील चिडेल, आणि तें तात्याला समजलें म्हणजे तो आईला गुरासारखी मारेल, आपल्या आवाळांवर फोंका ओढील. जिवाच्या करारानें तुक्यानें खंडोबाच्या टाक्याचा मोह टाकला. ओंजळभर पाणीदेखील प्याला नाहीं. टाक्याला वळसा घालून, वाळवंटांत चुकरें उंटाचें पिल्लूं चालावें तसा तो पुढें चालूं लागला.

वेशीवर असलेल्या प्राथमिक शाळेला मधली सुट्टी झाली होती. चिंचेखालच्या पटांगणांत पोरें उवड्या घालीत होतीं. धगुरड्या पोरांनीं तेवढ्यांतल्या तेवढ्यांत बैदुलाचा डाव मांडला होता. एक पोर उजव्या हातानें कान धरून बसल्या गतीनें एक बैदूल ढोपरीत बदीपर्यंत नेत होता आणि बाकीचीं त्याच्यामागें नाचत ओरडत होतीं, "ढोपर ग पुंगे ढोपर!"

त्यांतल्या एकानें येणाऱ्या तुक्याला पाहिलें आणि शिमग्यांतलें सोंग पाहिल्याच्या अवखळ आनंदांत तो ओरडला, " उंटाचं पिल्लूं आलं रे, उंटाचं पिल्लूं आलं ! "

साऱ्या पोरांचे डोळे वेशीकडे वळले आणि क्षणार्धात बिचाऱ्या तुक्याची अवस्था कुत्र्यांनीं वेढलेल्या भिकाऱ्यासारखी केविलवाणी झाली. भुवया ताणून, आंवढा गिळून तो गप्प राहिला. पुढें चालूं लागला. पोरें त्याच्यामागें लागलीं. त्याचें आवाळूं चांचपूं लागलीं. त्याच्या हाऱ्यांतलीं

पानें पिपाणी करण्यासाठीं काढून घेऊं लागलीं. तुक्याला अगदीं भोंवळल्यागत झालें होतें. माथ्यावरच्या हाऱ्यासकट तो कोसळायच्या बेतांत होता, एवढ्यांत घंटा खणखणली—आणि जमलेलीं सारी भुतावळ पाठीला पाय लावून शाळेकडे पळाली. जातांना एका पोरानें एक पुटका बैदूल उगीचच तुक्याचें नाक नेमून मारला. तुक्याच्या नाकावर तो अचूक लागला. तुक्या कळवळला. मारणारें पोर टाळ्या वाजवीत शाळेच्या दरवाजाकडे धांवलें आणि मग तुक्याची सुटका झाली.

गीता लेंकराची वाटच पाहत होती. तुक्या येतांच ती घाईनें पुढें झाली. त्याच्या माथ्यावरचा हारा तिनें उतरून घेतला, आणि " फार ताप झाला ग माझ्या लेंकराला ! "—म्हणून त्याचें घामेजलें तोंड तिनें कुरवाळलें. तसें घामांत मिसळलेल्या रक्तानें तिचे हात लालसर—ओलसर झाले. तुक्याच्या नाकांतून रक्त वाहत होतें.

" काय झालं रे ? "

तुक्या कांहींच न बोलतां खाली बसला. मागल्या भिंतीशीं त्यानें डोचकें टेकलें आणि एक दीर्घ निःश्वास सोडला. तो तोतरा होता. बोलतांना त्याला फार यातायात पडे. एका वाक्यांत तो तीन—चारदां थांबे.

"काय झालं रे?-पडलास कुठं?" पदरानें त्याच्या तोंडावरचें रक्त पुशीत गीतानें घाबरून विचारलें.

"पाणी " तुक्या एवढेंच बोलला. गीता " आणते " म्हणून आंत धांवली. तुक्यानें धाप टाकली. डोळे खूप रुंद केले. मिटल्या मुठीनें ओठाच्या कडेला आलेला फेस पुसला आणि तो धडपडून उठून उभा राहिला. कसेंबसें त्यानें अंगातलें फाटकें कुडतें काढून फेकलें आणि त्याच्यावरच पालथा पडून तो धसमसून रडूं लागला. रडतांनासुद्धां त्याला विलक्षण त्रास होत होता. वरधाप लागत होती. प्राण घोटळल्यागत होत होते.

जळून—जळून काळयाकुळकुळीत पडलेल्या जस्ती डब्यांतल्या गरम पाण्यानें तुक्यानें आंघोळ केली. आईच्या जुनेराच्या धडप्यानें अंग पुसलें.

हातावर गोपीचंद उगाळला आणि त्याचा टिकला कपाळावर लावण्यासाठीं म्हणून त्यानें भिंतींत खोवलेल्या भिंगांत पाहिलें. फार भयाण चेहरा होता त्याचा! खवडे होऊन डोक्यांतले केस ठाई-ठाई गेलेले, निरुंद कपाळ, तुरळक केसाच्या भुवया किचमिचे डोळे, फेंफाणें नाक, जाड-जाड ओठ आणि या साऱ्या कुरूपतेवर मोड्यांनीं मारलेले असंख्य विद्रूप ठिपके. तुक्यानें तोंड वळवलें आणि कपाळावर कुठेंतरी गंधाचा टिकला लावून टाकला. भिंतीतलें भिंग अगदीं लहानसें, बैलाच्या झुलींत असतें तेवढेंच होतें. त्यामुळें तुक्याला स्वतःच्या चेहऱ्याच विद्रूपपणा तेवढा जाणवला. उरापाठीवरची विद्रूपतेची गांठोडी त्याच्या दृष्टींतून सुटली. गीतानें त्याला हांक मारली आणि सांगितलें, " तुकारामा, देवावर तेवढं पाणी घालून ये राजा, मग घांसभर खा न् झोप. फार ताप झालाय् तुला ! "

हातांत एक पाण्याचा तांब्या, त्या तांब्यावरच बाहेरच्या अंगावर चंदनाच्या गंधाचा चोथा आणि रुईचीं फुलें. तुक्या मारुतीची पूजा करण्यासाठीं निघाला होता—'देवाची पूजा कशासाठीं करायची ?—काय भलं केलंय देवानं आपलं ? शरीर हें असं पंगू केलंय,बाप तो तसला तिरसट'—देवाच्या कनवाळूपणाच्या कथा त्यानें देवळांत चालणाऱ्या पुराणांतून मोप ऐकल्या होत्या—'त्या साऱ्या खोट्या असतील. मी देवाचं काय केलं आहे म्हणून तो शाळेतल्या पोरांकडून माझी फजिती करवतो ? मी पळसाची पानं आणायला गेलों म्हणजे उन्हाचा तडाखा वाढवितो—'—असल्या कांहीं विचाराबरोबरच तो देवळाच्या दिशेनें जात होता, तो थबकला.

देवळाच्या अलीकडच्या अंगाला काशा जौंदाळाचें घर होतें. त्याचें परडूं देवळाच्या पायवाटेजवळ येई. परड्याला कुंपण होतें. बाभळीच्या कांट्याच्या आंतलें सारें दिसे. अडुळशाच्या झुडपाच्या आडोश्याला जौंदाळाची सून पाणी न्हात होती. ती विवस्त्र होती. दुपारच्या वेळीं खेड्यांत कुणी येत-जात नाहीं. कुणब्याच्या बायका अशा बिनघोरी न्हातात. ऐन वयांतली गोरीपान पोर ! तुक्या थांबला. त्याच्या वयानें त्याच्या अधू अंगांत वीज खेळवली. जौंदाळाची सून उभी राहिली. जोराचा श्वास ऐकूं आला, म्हणून तिनें पाऊलवाटेकडे पाहिलें. तों तुक्या दृष्टीला पडला.

तुक्या मनांत खूप हबकला. पण तिच्या चेहेऱ्यावरचा भाव रतिमात्र पालटला नाहीं. कुणीहि माणसाला लाजेल ! तुक्या म्हणजे जणु जनावर. ती त्याच्याकडे पाहू्न तिरस्कारानें हसली आणि पाठमोरी झाली. तिच्या काळ्याकुळकुळीत मोकळ्या केसांचा ओला थाट गोऱ्या पाठीवर निथळत होता. तुक्याच्या अंगांतली वीज सणसणली–त्याला वाटलें, जाऊन–'त्या ओल्या केसांत तोंड घुमटावं. छातीवरचीं तीं बेलफळं–'–तुक्या तिथून हालला. त्याला तसें उभें राहतांना बापई माणूस पाहतां तर त्यानें त्याचें कुबड दगडाखालीं ठेचलें असतें–

देवळांत जाऊन तुक्यानं मारुतीवर पाणी ओतलें. त्याच्या कुरूप चेहेऱ्यावर कुठेंतरी गंधाचा टिकला लावला. गंधावरच एक फूल चिकटवलें, आणि मघाच्या गोरेपणाच्या कैफांतच तो देवळाच्या पायऱ्या उतरला. तो जरा जलद चालत होता.पाय पोळताहेत हें त्याच्या लक्षांताहि येत नव्हतें–' तिची आंघोळ संपली नसेल तर जातां-जातां तिला आणखी थोडीशी पहावी. आपल्याला कोणी लाजत नाहीं हें एकपरी बरेंच. डोळ्यांना तरी भरपूर थंडावा मिळतो- ' –त्याच्या बोलण्यासारखेच त्याचे विचारहि अस्पष्ट आणि त्याला स्वतःला फार तापदायक होत होते. तो चालत होता. जौंदाळ्याच्या परड्याजवळ तो आला तेव्हा ओली नागीण आपली हिरवीगार साडी परड्याच्या कुपावर वाळत घालीत होती. तिचे केस मोकळे होते. तिचा रसरशीत चेहेरा तुक्याच्या बाजूलाच होता. काळेभोर डोळे, सरळ नाक, लुसलुशीत गाल, हनुवटीवर चुटुकलं गोंदवण–तुक्याचे डोळे दिपले. तिचे केस मोकळें होते, पण आतां ती चोळी ल्यायली होती. तिनें कांहींतरी आडवें लावलें होतें. तुक्या थांबलेला तिच्या लक्षांत आला–अगदीं सहजपणें तिनें विचारलें, " झाली कां पूजा, तुकाराम ? "

तुकाराम कष्टानें " हो " म्हणाला आणि चालूं लागला. त्याच्या अंगातली वीज बिथरली होती. त्याला नाहीं तिकडे नेत होती.

...जौंदाळाच्या घरांत–भरदुपारीं–त्यानं ओल्या केसांत तोंड खुपसलं–त्याच्या तोंडावरच्या मोड्या साफ निघून गेल्या. आणि रंग नितळ

सांवळा झाला–उरापाठीवरचीं आवाळें गळून पडलीं–तुकाराम आणि ती ओली नागीण...

तो घरीं पोहोचला. गीता पत्रावळी लावीत होती. ती उठली. तिनें त्याला जेवायला वाढलें. त्याला जेवण गेलें नाहीं. आईनें अर्थ लावला, " उन्हानं काहिली झाली. त्यानं अन्न जाईना पोराला." हात धुण्यासाठीं तो बाहेर गेला. दारांतल्या बेलाच्या झाडावर दोन बेलफळें स्तब्ध लटकत होतीं. भोवतीं हिरवींगार पानें दाटलीं होतीं. तुकारामाच्या अंगातली वीज वरळूं लागलीं–' हिरवी साडी–हिरवी पानं–बेलफळं–आपलीं आवाळं–'

तो इतका शिणला होता, ऊन एवढें तापत होतें, तरी त्याचा डोळा लागला नाहीं. डोळे मिटून तो स्वस्थ वाकळेवर आडवा झाला होता. गीता विळयानें चोयट्या कापीत होती. त्याला वाटलें, ' याच विळयानं आपलीं आवाळं जखम न होतां अलगद कापलीं जावींत. भरदुपारच्या प्रहरीं, जौंदाळाच्या कुंपणावरून आपण हरणासारखी उडी घ्यावी. ओल्या केसांत तोंड घुसमटावं आणि–'

तो सारखा या कुशीवरून त्या कुशीवर वळत होता. मधेंच तो उठून बसला—

" झोंप येत नाहीं कां रे ? " गीतानें विचारलें.

" नाहीं."

" ऊन फार तावतंय "

" हं. "

तुक्या दारांतून समोर पहात होता. दारासमोर आलेल्या बेलाच्या आडव्या फांदीवर दोन चिमण्या होत्या. दोन बेलफळें लटकत होतीं. काळया डोक्याची चिमणी, तांबूस डोक्याच्या चिमणीच्या पाठीवर बसून पंख फडफडीत होती. खालची चिमणी लाडीक चिंव-चिंव करीत होती—काळया डोक्याची उतरून पलीकडे जात होती. परत पंख फडफडवीत होती. अलीकडे येत होती. परत दुसऱ्या चिमणीच्या पाठीवर बसत होती. परत पंख फडफडवीत होती. खालची चिमणी लाडिक चिंवचिंव करीत होती

चिमण्यांच्या या खेळांत वारा नसतांनादेखील हिरव्या पानांतलीं तीं बेलफळें अलगद हालत होतीं तुक्या पुन्हां आडवा झाला. त्याचें सारें अंग जळ-जळत होतें. खंडोबाच्या टांक्यांत जाऊन पडावें असें त्याला झालें होतें. तो तळमळत होता. मध्येच बैलासारखा जोरजोरानें उच्छ्वास सोडत होता. बाहेर ऊन तावत होतें, आंत आग पेटली होती. तुक्याला झोंप येणें शक्यच नव्हतें—तो तसाच तळमळत राहिला.

ऊन तसेंच भयंकर रखरखत होतें. बेलाच्या झाडाची सांवली त्या उन्हांत वाकडीतिकडी तळमळत होती. तुकाराम घामाघूम होऊन, धापा टाकीत दाराशीं आला. तो दाराला कुलूप. शेजाऱ्याकडे त्यानें चौकशी केली. पण गीतानें किल्लीहि ठेवली नव्हती. तुकाराम खूप चडफडला. त्याला वाटलें. धोंडा घेऊन कुलूप चेंचावें. बळ असतें तर त्यानें हिसकून तें तोडून काढलें असतें. चेंचावें तरी कसें?–कुलुपाचे पैसे वायां जातील, आणि तात्या आपल्या कुबडावर निर्दयपणें फोका ओढील. त्याला कांहीं सुचेना. एव-ढ्यांत त्याच्या लक्षांत आलें, त्याच्या जानव्यालाहि किल्ली आहे. ती किल्ली होती देवळाच्या कुलुपाची. चिडलेल्या तुक्यानें संतापून तीच त्या कुलुपावर चालवली. झीट येईतों वांकडीतिकडी फिरवली आणि, कसा कुठें खटका जमला कोण जाणे, घराचें कुलूप पटकन् निघालें. तुक्याला अत्यानंद झाला आणि त्याच क्षणीं त्याच्या मनांतल्या विचारानें त्याच्यावर विरजण घातलें. कुलूप कुठें दुखावलें तर नाहीं?—दार उघडायचं सोडून तो कुलूपच डोळ्याशीं धरून पाहूं लागला. तोंच मागून गीता आली तिनें हाक मारली, " तुकाराम— "

तुकाराम जागा झाला. गीता केर काढीत होती. तिच्या पत्रावळी विणून झाल्या होत्या. त्यांचा गठ्ठा व्यवस्थित बांधून तिनें कोपऱ्यांत ठेवला होता.

" तुकाराम ! ऊठ बाळा. दिवस मावळायला आला. चूळ भर आणि या पत्रावळी पाटलांच्या वाड्यांत पोचवून ये. मग ' वाढून ' मिळेल ते आणायला मी जाईन. "

स्वप्नांतल्या कुलुपाचा प्रकार तुक्याला कळला नाहीं. त्याला झोप चांगली लागली नव्हती एवढें खरें. जौंदाळाच्या सुनेचें गोरेपणच त्याच्या झोपेंत मिसळलें होतें. अंगांतली वीज अजून नाचत होती. थयथयाट करीत होती.

तो उठला. चूळ भरली. पत्रावळीचा भारा घेऊन पाटलांच्या वाड्याकडे निघाला. जातांना तो मुद्दामच जौंदाळाच्या परड्यावरून गेला. ती हिरवी साडी वाळली तरी तिथेंच होती. मागचें दार बंद होतें. अडुळशाचें झाड वाऱ्याबरोबर झुलत होतें, पण त्याला बेलफळें नव्हतीं. ती साडी बघतांच तुकारामाच्या अंगांत पुनः कसलातरी झटका आला. त्या झपाट्यासरशीं तो पुढें झाला. माथ्यावरच्या पत्रावळीचें ओझें पेलून, मागें पाहत-पाहत त्यानें त्या साडीला स्पर्श केला. अंगांतली वीज डोळ्यापुढून मस्तकांत शिरली. त्याचें सारें अंग शहारलें. त्याला वाटलें, आपण जौंदाळाच्या सुनेच्या मांडीलाच चिमटा काढला. या कल्पनेलाच तो भ्याला. मागें सरला आणि-आणि पुन्हा त्या साडीकडे वळून पाहत अंगांतली वीज अंगातच कोंडून तो पाटलाच्या वाड्याकडे निघाला.

पाटलाच्या वाड्यांत सोप्याला सत्यदेवाची कथा ऐन रंगांत आली होती. माणसें बरींच जमलीं होतीं. तुक्या समोरच्या दरवाजांतून आंत गेला नाहीं. कुणी थट्टा करायचें आणखी. परसदारानें गेला. परसदारीं दोन तरण्याबांड पोरी रहाटावर पाणी ओढीत होत्या. त्या दोघींच्याहि पाठीवर मोकळे केस होते. त्यांतल्या एकीची साडी हिरवीगार होती. त्या दोघीजणी कांहीं बोलत होत्या. संध्याकाळच्या शीतल प्रकाशांत तुक्या तें पहात होता. त्याच्या डोक्यांतली वीज गरागर फिरत होती त्याचें काळीज वर-वर ओढीत होती. पोहरा वर येऊन, हिरव्या साडीची तरुणी तो घंगाळांत ओतणार तोंच तुक्याकडे तिचें लक्ष गेलें—

'ईऽऽ' ती भिऊन चरकली. भ्याल्यानंतर ती इतक्या चलाखीनें हालली, अशी सुंदर लचकली, कीं तुक्याला वाटलें तिला तशीच धरून ठेवावी.

" अगबाई ! असला कसला माणूस हा ? "

ती बुजरी पोरगी किंचित् तिरस्कारानें आणि बऱ्याचशा अनुकंपेनें बोलली, " पाठीवर ग काय आहे याच्या ? "

" आवाळू आहे. " पाटलाच्या सुनेनें आपल्या पाठराखणीला सांगितलें.

" एवढं मोठं ? " बुजरीनें आपली कमानदार भुवई वर उचलीत विचारलें.

" करणी देवाची ! " पाटलाची सून म्हणाली

" हाडं नसतात आवाळूंत ? "

" कोण जाणे ! बघ हवी तर ! " बेफिकिरीनें पाटलाची सून म्हणाली.

ती बुजरी धिटाईनें पुढें झाली, आणि गोगलगाय चाचपतांना होईल तितका चेहेरा वांकडा करून तिनें त्याची पाठ चक्क चांचपून पाहिली तिचा स्पर्श होतांच तुक्याला शिरशिरी आली. अंगांतली वीज सारखी उशापासून पायथ्यापर्यंत अस्वस्थपणें भिरभिरूं लागली. "या पत्रावळी—" एवढेंच सांगून तो परसदारानेंच बाहेर पडला.

एखादा पेटलेला काजवा अंधारांतून द्रुतगतीनें जावा तसा तुकाराम जात होता. त्याचें मन कोकलत होतें—देवाची करणी !- देवाची करणी माझ्यापुरतीच अशी विद्रूप कां ?–त्या जौंदाळाच्या सुनेला त्यानें ओल्या हळदीचा रसरशीतपणा दिला, पाटलाच्या सुनेला उतूं जाईल इतकं रूप दिलं, बुजरीला हरणासारखे गोड डोळे दिले न् मला हीं आवाळं–'

विचारांच्या गतीसहच तो जौंदाळाच्या परसाजवळ आला त्या ओल्या नागिणीची साडी कांटे-कुंपणावर वाळत होती. तुक्याच्या डोक्यांत पुन: कसलीतरी सणक उठली. अंधार हळूहळू उतरत होता. जौंदाळाच्या घराचें मागचें दार बंद होतें. अंवतीभंवतीं माणूसकाणूस कोणी नव्हतें. चावडीमागच्या दावणींत बांधलेला खोंड डरकत होता. एक खिलारी गाय दूर पडलेलीं चिपाडें चगळींत होतीं. जिवाचा धडा करून तुकारामानें ती

साडी कां~ावरनं काढली. तिचा बोळा काखेंत मारला आणि जन्मांत साधली नसती इतक्या जलदीनें त्यानें धूम ठोकली.

गीता देवळाकडे जायला निघाली होती. ती तुकारामाला म्हणाली, " आलास पत्रावळी देऊन ? मी देवळांत जाते, दिवा लावते न् तिथनं तशीच जाते पाटलांच्या वाड्यांत. रात्रीं कीर्तन आहे. दुपारचा नैवेद्य आहे तो तूं खा. मला यायला मध्यान होईल ! "

" हं " तुकाराम म्हणाला आणि घराच्या चौकटींतून सटक्यानें आंत शिरला.

त्याला जेवण सुचलें नाहीं. पुढच्या खोलींतच आधाशीपणानें त्यानें एक तरट अंथरलें, त्यावर त्या साडीची चौपदरी अंथरली. दार लावून घेतलें. आणि उन्हानें हैराग झाल्यावर खंडोबाच्या गार तळयांत अलगद सुळकी मारावी तशी त्यानें त्या अंथरुणावर मारली. जौंदाळाच्या सुनेचें ओलें लावण्य, बुजरीचा नाजुक स्पर्श, तिच्या भुवईची कमान, बेलफळाचा कठीणपणा—पिकलेल्या निंबुंड्याची आंबट चव-नाना गोष्टी तो अनुभवीत होता. उन्हांत तापलेल्या चिमण्या मातींत गडबडा लोळतात, पंख फड-फडतात तसें करीत होता—

लिंबाच्या मोहराचा वास, गव्हाच्या लोंब्यावरचा ओलसर वारा, दिवाळींतली पहांट—त्याच्या अनुभूतींत हीं सारीं सुखें एकत्र आलीं होतीं. आपलें अवघड अंग तो मनमुराद लोळवीत होता. हळूहळू लोटांगण थांबलें त्याच्या अंगांतली शीरन् शीर शिथिल झाली. पानाआडची बेल-फळें करकचून आवळून त्यानें फेकून दिलीं. त्रिदळ बेल तेवढें तोडलें—त्याचा भारा छातीशीं धरून तो परतला—त्याला गाढ झोप लागली.

सकाळीं चावडीवर बोभाटा झाला. जौंदाळाच्या सुनेची साडी चोरीला गेली. गांवरखवालदार तलाश घेऊं लागले. ओल्या नागिणीनें तुक्या-चाच वहीम घेतला. बापू रामोशी गुरवाच्या घरीं आला—तेव्हांहि तुकाराम गाढ झोपला होता. बाजारांहून परतलेल्या तात्या गुरव शेरडीचे चाळीस रुपये गीताला मोजून देत होता.

" तात्याबा ! " रामोशानें हांक दिली.

" काय ? "

" तुकाराम कुठायता ? "

" निजलाय अजून ! कां हो ? " गीता म्हणाली.

" पाटलांनीं बोलावलंय ! " रामोशी बोलला.

" मी येतो कीं–" तात्या.

" नाहीं. त्यांच्याकडंच काम आहे ! "

" अजून कसं झोपलंय कुबडं हें !–तुक्या, तुक्या–उठ कीं लेका–तुक्या–" तात्याच्या कर्कश हाकांनीं तुक्या जागा झाला.

दारांतून आंत आलेलीं गोड उन्हें थंडींतल्या शेकासारखीं त्याला सुखद वाटत होतीं–त्यानें उठून आळस दिला–

" तोंड धू न् चावडीकडं जा. पाटलांनीं बोलावलंय– " तात्या खेकसला.

तुकाराम मुकाट्यानें उठला.

उंबऱ्याशीं बसतां-बसतां एकदम चमकून बापू रामोशी " हीच ती साडी !" ओरडला.

" म्हणजे ? " तात्या बोलला.

" जौंदाळाच्या सुनेची ही साडी चोरली तुमच्या लेकानीं. " अंथरुणाला शिवून बापू रामोशानें ती साडी उचलली !

पिसारी तात्याचा तोल एका क्षणांत सुटला. आंत जात असलेल्या तुक्याला त्यानें बावळें धरून मागें खेचला, आणि तोंडानें लाख शिव्या मोजीत त्याला पडेतोंपर्यंत मारला. तुक्या एक अक्षर बोलला नाहीं. कष्टानें हुंदके देऊन तो केविलवाणें रडत होता. कुंभारानें चिखल तुडवावा तसा तात्या त्याला तुडवीत होता.

जखमी गिधाडासारखा तुक्या चावडीच्या कोपऱ्यांत निपचित पडला होता. पाटील गीताला जाब विचारीत होते. त्यांनाहि तुक्याची कींव आलीं

होती. मुद्देमाल सांपडला होता. तुक्या बेशुद्ध होता. गीताला तर तोंडच नव्हतें–

“ हें असं कसं केलं ग यानं, गीता ? ” पाटलांनीं विचारलें.

रडून-रडून डोळे सुजलेली गीता कपाळावर हात मारून अपराधी आवाजांत आवाजांत बोलली, “ देवाची करणी !”



## सिनेमांतला माणूस

७

नव्या कोऱ्या सायकलवरून झाकींत शाळेंत येणारा मोहन अभ्यंकर माझ्या चांगला ओळखीचा झाला होता. अभ्यासांत तो मोठा वाढ होता असें मुळींच नाहीं, पण त्याचें वागणें मोठें टुचबाज होतें. माझ्याच वयाचा, पंधरा सोळा वर्षांचा होता तो. त्याची घरचीं स्थिती चांगली होती. रोज निराळया रंगाची हाफ पँट आणि वेगळया कॉलरचा सदरा तो वापरूं शकत होता. पुस्तकांसाठीं त्याच्याजवळ एक छानशी कातडी बॅग होती. ती बॅग आणि जेवणाचा डबा सायकलीच्या चकचकीत हँडलला लटकावून शीळ घालीत यायचा तो. पाऊस पडत असला तर पावसाळी कोट घालून निथळत यायचा गडी. त्याच्या पायांत चकाकणारे बूट, नाहींतर टांचेमागें वादी असलेल्या पठाणी वहाणा असायच्या. त्याच्यावर धूळ साठूंच द्यायचा नाहीं तो.

इंग्रजी चवथी शिकणाऱ्या मुलाजवळ इतक्या वस्तू असणं मला मोठं कुतूहलाचं वाटत असे. महिन्याच्या अगदीं पहिल्या तारखेला तो मास्तरांना फी आणून द्यायचा. मी नादार विद्यार्थी होतों. मला फक्त सहा आणे द्यावे लागत, पण तेवढेच मिळवायला मला कोण यातायात पडे! वडिलांना मागितले तर ते म्हणायचे,

" पैसे सांगितले आहेत सोनाराला करायला ! "

" मास्तर वर्गांत बसूं देत नाहींत फी दिल्यावांचून." मला तळमळून सांगावें लागे. मग ते वैतागानें म्हणत,

" सोडा शाळा "

महिना अखेरीला टेकला म्हणजे आई कुठून तरी उसनवारी करी. मला फी भरण्याची शक्यता होई. ठिगळावांचून विजार घालण्याचें भाग्य मला फार कमी वेळां लाभे. शर्टाच्या जस्ती गुंड्या हरवल्या तरी त्या पुनः मिळायची पंचाईत पडे.

मधली सुट्टी झाली म्हणजे मुलें घरीं पळायचीं. त्यांच्या आया त्यांना मधल्या वेळीं कांहीं खाऊ द्यायच्या. आमच्या घरीं तसें कांहींच नव्हतें. दुपारच्या जेवणांतच मधल्या वेळची भूक शमवून घ्यावी लागे. दुपारचें मिळायचीच मारामार ! मग हे मधल्या वेळचे चोचले कुठले भागायला ! भाकरी असली तर भाजी नसे. कालवणाला तुरीची डाळ असणें ही सुद्धां अपूर्वाई वाटे. भात आणि तूप यांची चैनीच्या वस्तूंत गणना केली जाई. जोंधळ्याच्या पिठाचें पिठलें कुणी करील का ? माझी आई करायची. शेंगदाण्याची आमटी खरें तर उपवासाला करतात. पण आम्ही जोंधळ्याच्या भाकरीशीं शेंगदाण्याची आमटी खाण्याचा सराव केला होता. शेंगांच्या हंगामांत आई थोडी कमाई करी. शेजाऱ्यापाजाऱ्यांकडचे शेंगांचे वेल घरांत आणी. शेंगा तोडण्याचा रोजगार करी. ब्राह्मणाच्या बाईनें उघड मजुरी कशी करायची ? तोडलेल्या शेंगांचा आठवा किंवा दहावा हिस्सा तिला मजुरी मिळे. घरांत शेंगा येत. त्यांचाच उपयोग केला जाई. शेंगदाण्याची आमटी, शेंगदाण्याची उसळ, शेंगदाण्याचीच चटणी. असे नाना प्रकार आई करी. पैसा दुर्मिळ—आतिशय दुर्मिळ होता.

मोहन अभ्यंकरची श्रीमंती पाहून मला आश्चर्य वाटे. त्याच्याशीं मैत्री करण्यांत आपला मान आहे अशी जाणीव मोहरे मधल्या सुटींत मोहन एकटाच शाळेंतल्या अंब्याखालीं फराळाला बसे. अगदीं एकटाच बसे. कारण तोच तेवढा परगांवाहून शाळेला येत असे ना ! एकावर एक असलेले दोन तीन डबे तो उघडायचा. रोजच्या रोज शिरा पुरी, लाडू असले दिवाळींतले जिन्नस खायचा. शिरा खायला तर त्याच्याजवळ चमचा पण असे. तो चमच्यानें जेऊं लागला कीं—खोटें कशाला सांगूं—मल

त्याचा हेवा वाटायचा. आमच्या घरीं चमचा वापरीत, तो बाळाला दूध घालण्यापुरता.

पाणीसुद्धां तो बेटा आपल्या गांवाहून आणीत असे. पाण्यानें भरलेली एक कापडी पिशवी तो इथूनतिथून वागवीत आणी. तिच्यातलें पाणी गार आणि चविष्ट असे. फराळाचें मागण्याचा मला धीर व्हायचा नाहीं. चमच्यानें शिऱ्यांतला बेदाणा तोंडांत टाकतांना त्याला पाहिला म्हणजे माझ्या तोंडाला पाणी सुटल्यावांचून राहात नसे. मग मी त्याच्याकडून पिशवींतलें पाणी मात्र मागून घ्यायचा. प्यायचा. तापलेल्या भुकेच्या डोक्यावर तेवढेंच ओलें फडकें टाकायचा.

'आ+रुह्' चें तुबंत 'आरोढुं' होतें हें मोहनला कधीं सांगतां आलें नसतें. मला तें येत होतें. माझा अभ्यास चांगला होता.

परीक्षा जवळ आली तसा मोहन अभ्यासासाठीं आमच्या गांवींच राहिला. आम्ही दोघेहि शाळेंत झोपूं लागलों. संगतीनें अभ्यास करूं लागलों. मोहनच्या जेवणाचे डबे सर्व्हिस मोटारनें येत. माझ्या हिशेबीं तो अगदीं राजपुत्र होता.

आमच्या वर्गांत चारदोन मुली होत्या. त्या माझ्याशीं कधीं बोलतदेखील नसत. कशाला बोलतील ! मी गरीबाचा मुलगा होतों ना ! त्या पोरी मोहनशीं मात्र बोलत. आमच्या गांवीं हायस्कूल होतें, पण मोठीं दुकानें नव्हतीं. मोहनचा गांव कारखान्याचा. तिथें त्याच्या वडिलांचें जंगी दुकान होतें. लोकर, सुया असले प्रकार तो येतांना आणायचा आणि पोरींना फुकट देऊन टाकायचा. त्यामुळें मुली त्याच्या भंवतीं भंवतीं करीत. पिंगा घालीत. एखाद्या मुलीनें आपल्याशींहि बोलावें असें मला वाटत नसे असें नाहीं. पण त्या बोलणार नाहींत याची मला खात्रीच असे. गरीबी तेवढा विचार अचूक पढविते.

मास्तरांनीं विचारलेल्या एखाद्या प्रश्नाचें उत्तर मी अचूक दिलें, म्हणजे मुलांबरोबर मुलीहि माझ्याकडे पहात. तेव्हां मला ओशाळल्यासारखें होई. आपल्या शर्टाची बाही फाटली आहे, कॉलरला फांद्या फुटल्या आहेत,

शर्टला एकच बटण आहे, याची अशा वेळीं फार लाज वाटे. साऱ्यांचे डोळे चुकवीत मी खालीं बघूं लागे.

कधीं कधीं मोहन रंगांत आला म्हणजे दिवाणांची चंदू आपल्याशीं काय काय बोलली तें खुलवून सांगे. तेव्हां तर त्याचे कपडे लुबाडून आपल्या अंगावर घालावेत असें मला वाटे. अभ्यासाला बसलों म्हणजे मोहन ह्याच गोष्टी जास्त बोले. माझ्या हातून ' ए+ बी ' वरची पेन्सील गळून पडे. मोहनचें भाग्य ! मोहन राजपुत्र !—असे विचार डोक्यांत रिंगण धरूं लागत.

वार्षिक परीक्षा अगदीं नजीक आली होती. मोहन शाळेंतच रहात होता एक दिवस सर्व्हिस मोटार आलीच नाहीं. मोहन चिडला. भूक काय, श्रीमंतांची अन् गरीबाची सारखीच ! त्याची ती तडफड पाहून मला थोडसें बरेंच वाटलें.

" आमच्या घरीं येतोस जेवायला ?" मी न राहून बोललों. गरीबाच्या घरीं जेवायला जाणें त्याला आवडण्यासारखें नव्हतें. पण करतोय् काय ? होय, नाहीं म्हणाला, पण अखेर आला.

मोहन आमच्या घरीं पहिल्यांदांच आला होता नि आमच्या एवढ्याशा घरांत भयंकर धूर झाला होता. उंबऱ्यांत केरसुणी पडली होती. आणि सगळयांत वाईट म्हणजे माझीं धाकटीं भावंडें फार मळकट अवतारांत वावरत होतीं. मूर्खांसारखीं रडत होतीं. आणि आई तर एक तोटकें धोतर लुगड्यासारखें नेसून चुलीशीं बसली होती. ' मी मोठा झाल्यावर एकदम नवं कोरं पातळ तिला आणून देईन ' असें मीं मनांत ठरविलें. पण त्या वेळीं मात्र तिच्या वेंधळेपणाचा मला संताप आला.

घरांत दोनच पाट होते. एक आईनें घेतला होता. दुसरा मधेंच आडवा पडला होता. मोहनला तो द्यावा म्हणून मी उचलूं लागलों, तशीं आई ओरडली,

" अरे, अरे, तो उचलूं नको ! "

" कां ? " मी तिरसटपणानें विचारलें खरें, पण त्याच वेळीं माझ्या लक्षांत आलें कीं, पाटाखालीं माझ्या धाकट्या भावंडाची करणी दडवली

असावी. गरीब माणसें घाणेरडीं असूं नयेत, पण असतात. मी पाट तसाच ठेवला आणि एक पोतें अंथरीत मोहनला म्हणालों,

" बस. "

कुसळांच्या माळांवर बसावें इतक्या काळजीपूर्वक मोहन त्या पोत्याच्या रकट्यावर बसला. आईनें ताटें वाढलीं. नुसती भाकर नि आमटी.

" हं, कर सुरू—" मी.

मोहनचा डबा कसा असतो तें मला माहीत होतें. त्याच्यापुढें असलं कदान्न ठेवण्यांत आईनें अगदीं अडाणीपणा केला होता. मी मनांत धुसमुसत होतों.

" आम्ही देशस्थ माणसं;भात नाहीं आवडत कुणाला !" मोहनच्या थांबण्याचें कारण आईनें ओळखलें होतें. ती दारिद्र्य लपविण्याचा प्रयत्न करीत होती. मला भयंकर अपमानित झाल्यासारखें झालें होतें.

" पण तो कोकणस्थ आहे, आई !"

भातावांचून पान वाढण्यांत आईनें चूक केली होती. मी चिडून बोलत होतों.

" मग आधीं सांगायचं नाहींस का ? केला असता. " आई चक्क खोटं बोलत होती. घरांत तांदूळच नसतील.

दांत न आलेल्या वासरानें पेंड चावलावी तशी मोहननें अर्धी भाकरी मोठ्या कष्टानें चावलली आणि तो उठला. त्याच्या चेहऱ्यावरचा तो तिरस्कार मी जन्मांत विसरणार नाहीं. त्यानंतर त्याला घरीं जेवायला बोलाविण्याचा मूर्खपणा मी पुनः कधींहि केला नाहीं. त्याच्या डब्यांतलें मात्र पुष्कळदां खालें. अपमान वाटत होता; पण—तें दुर्भिळ अन्न खाण्याचा मोहहि टाळतां येत नव्हता. मोहन मला आपला मित्र मानीत होता. त्यांतच मला धन्यता वाटत होती.

चित्रपटाच्या नव्या व्यवसायांत माझें बस्तान बरें बसलें होतें. लहान लहान भूमिका मिळत होत्या. मोहनसारखी सायकल आणि डबा मी घेऊं शकलों होतों. आईला आतां चांगलीं लुगडीं फाडायला मिळत होतीं. भावंडें

ठिगळ नसलेल्या चड्ड्या घालून शाळेंत जाऊं शकत होतों. माझें बरें चाललें होतें. गेल्या दहा वर्षांत मोहनची व माझी गांठभेट नव्हती. क्वचित् पत्र-व्यवहार होत होता. त्यांत मला कळलें होतें—त्याचे वडील वारले.

एका सकाळीं मोहनच्या लग्नाची कुंकम–पत्रिका माझ्या हातांत येऊन पडली. भाडेंखर्च आणि अहेर करण्याइतपत पैसा गांठीशीं असल्या-मुळें मी लोखंडवाडीला गेलों.

लग्नसमारंभ मोठ्या थाटानें झाला. जमलेले लोक आपसांत बोलत होते, " वडिलांचे माघारीं पोरानें चांगला संसार करून दाखविला !"

मोहन आतां अधिकच देखणा दिसूं लागला होता. अंगापिंडानें भरला होता. उंचीनें उभारला होता. सोन्याच्या काड्यांचा चष्मा त्याच्या गोलवट चेहऱ्याला अधिकच शोभून दिसत होता. बोलणें थोडें मंद आलें होतें. बाकी शाळकरी असतांनाचीच झाकी वयानें मोठी झाली होती.

त्याच्या बंगलीसमोरच्या बागेंत वेतांच्या खुर्च्यांवर आम्ही बोलत बसलों होतों. लहानपणींच्या घोकंपट्टीच्या, अभ्यासाच्या आठवणी निघत होत्या. नको असलेली माझ्या घरच्या जेवणाची आठवण निघाली. मला वाईट वाटलें. त्यानें उगीच जखमेवरचें टरफल काढलें. कुणाची तरी चाहूल लागली आणि मोहन म्हणाला,

" या. "

त्याची पत्नी समोर आली. लग्नाच्या धांदलींत मीं तिला नीटसें पाहिलें नव्हतें. शिडशिडीत अंगयष्टि, उभट गोरापान चेहरा, जरा नकटें वाटणारें गोंडस नाक आणि गालावर चांगलें पैएवढें काळेंशार ल्हासें. मुलगी खरेंच सुंदर होती. मात्र तिच्या चेहऱ्यावर प्रसन्नता नव्हती, कीं मला पाहून तिनें तोंड कडवट केलें होतें, कोण जाणे. पण डोकें दुखत असल्यावर करतात तसा चेहरा तिनें केला होता.

" फिरायला नाहीं का यायचं ? " पाठीवरचा शेपटा छातीवर सटकीत जरा मुरडून ती नवऱ्याला म्हणाली.

" अरे वा, काल लग्न झालं नाहीं, तंवर—? " मी असा चोमडे-पणा करायला नको होता. कारण कपाळाला आंठ्या घालून ' हुडूत ' अशा नजरेनें तिनें माझ्याकडे पाहिलें. मी खजील झालों.

" अरे, तुला माहीत नाहीं का ? " मोहन म्हणाला," लग्नांत ओळख झाली नाहीं हिची नि माझी. हें आमचं Love Marriage आहे. " पुढच्या संभाषणाला कंटाळून कीं काय, ती निघून गेली. आणि मोहननें तिची नि आपली प्रेमकथा मोठ्या रसाळपणें सांगितली. लोखंडवाडीचे ते प्रभू पोस्टमास्तर त्यांच्याकडे आपण कॅरम खेळायला गेलों—ही खेळायला बसली, हातांना हाताचे स्पर्श–झिणझिण्या–शिरशिरी, मग हुंड्यांच्या मुलींना नाकारून आपण हिलाच पसंत केलें. तिच्या वडिलांना केव्हढा आनंद झाला—सारें सारें त्यानें रंगवून सांगितलें. मोहनचें नशीब राज-पुत्राचें आहे, याची मला परत खात्री पटली.

शूटिंगचें काम असल्यामुळें त्या दिवशीं संध्याकाळींच मी परत यायला निघालों. नव्या वैनीचा निरोप घ्यायला गेलों. पुनः तोच डोकें-दुखीचा चेहरा.

" वैनी, तुम्ही मोकळेपणानं बोलत नाहीं अजून ! " मी सहज बोलून गेलों.

" सिनेमांतल्या माणसांशीं बोलणं नाहीं आवडत मला ! " मानेला एक झटका मारून वैनी म्हणाली. मीं तोंड फिरवलें. मला तो अपमान असह्य झाला. घुटका गिळून म्हणालों,

" ठीक आहे !"

मोहन कौतुकानें हसला. मीं मनांत निश्चय केला. पुनः याच्या घराची पायरी चढायची नाहीं. मोहनला म्हणालों.

" बरंय्, मग येतों मी. "

" पुनः ये हं कधीं तरी. "

" हं. "

हीं प्रश्नोत्तरें नेहमींच अर्थशून्य असतात असें नाहीं, पण या वेळीं माझा होकर तरी निश्चित अर्थशून्य होता.

एका भल्या घरच्या मुलीशीं माझें लग्न झालें तव्हां मी मोहनला साधें निमंत्रणदेखील धाडलें नाहीं. मला त्याचा संताप आला होता. एका दिवसांत बायकोच्या आहारीं गेलेल्या त्या दळभद्र्या माणसाविषयीं माझ्या मनीं विलक्षण घृणा आली होती.

आईचें म्हणणें खरें असेल तर माझ्या पत्नीच्या पायानें माझ्या घरांत संपदा आली. करारांवर करार झाले आणि दोन चार वर्षांत माझा संसार गुलमोहराच्या झाडासारखा बहराला आला. एक अभिनयकुशल नट म्हणून साऱ्या महाराष्ट्रभर माझा बोलबाला झाला. वडिलार्जित कर्जे मी पार चुकविलीं. गांवांत थोडी शेतीवाडी झाली. धाकटा भाऊ गांवाकडे बघूं लागला. आमचें कुटुंब सुखवस्तू झालें. चालतीं, रांगतीं बाळें आईच्या म्हाताऱ्या डोळ्यांना समाधान देऊं लागलीं. वडिलांना ज्ञानेश्वरीचा नाद लागण्याइतपत उसंत आणि स्वस्थता लाभली. आतां आमच्या घरांतलीं माणसें शॉवरखालीं आंघोळ करूं लागलीं आणि टेबलाशीं बसून चमच्यानें जेवूं लागलीं. चमच्यानें जेवतांना मला पुष्कळदां लहानपणची आठवण येई...तें करणगांव—ती शाळा—तें आंब्याचें झाड. त्या झाडाखालीं बसून चमच्यानें शिऱ्यांतला बेदाणा खाणारा तो मोहन–तो राजपुत्र !...असो. खरें तर आतां मीं त्याचें नांव टाकलें होतें. तोहि मला विसरला होता. कसला मित्र नि कसलें काय ?

परीक्षा नापास झाल्यावर पडते तसली हवा पडली होती. वांझोट्या ढगांनीं आभाळ व्यापलें होतें. वाऱ्याची आई मेली होती.संध्याकाळ झाली होती तरी बाहेर पडावें असें वाटत नव्हतें. मुलाबाळांचा गलगाहि फारसा होत नव्हता. गॅलरींत एका रॉकिंग चेअरवर मी झोले घेत पडलों होतों. कांहीं वाचवत नव्हतें. लहानपणीं असें सुचेनासें झालें, म्हणजे मी जेवत असें. पण आतां तें पचण्यासारखें नव्हतें. 'गॅस्टिक ट्रबल्स' ही सुखवस्तू-प्रणाची निशाणी माझ्या पोटाच्या पाठीमागें लागली होती. खालचा रस्ताहि निर्मनुष्य होता. रहदारी बिलकुल नव्हती. शेजारच्या कुळवाडी

वस्तींतली पोरें ' अवधूत ' अवस्थेंत रस्त्यांतून हिंडत होतीं. ' करगोटा ' देखील नव्हता एकदोघांच्या कंबरेला. त्या मुलांना पाहून कीं काय, मला बाळपणींच्या आठवणी येत होत्या. ते दिवस आतां परत येणार नव्हते. आजाराच्या आठवणीसारख्या फक्त आठवणी उरल्या होत्या त्या...करण-पूर तिथली शाळा, फीच्या पैशाबद्दलची यातायात...या आठवणींतूनच मला मोहनची आठवण आली. त्या झाकींचें स्मरण झालें. त्याचा लग्न-समारंभ आठवला. त्याच्या त्या सुंदर बायकोचा डोकेंदुखीचा चेहरा आणि तुसडेपणा मला पुनः बोंचला. मी आज सुखवस्तू झालों होतों, पण सिनेमांतला माणूस असल्यामुळें माझ्या सुखांत रया नव्हती ! अंत्यवि-धीच्या सामानाचा व्यापार करणारा माणूस कितीहि श्रीमंत झाला, तरी व्यापारी मंडळींत त्याला स्थान नसतें ! अशी कांहींशी कल्पना माझ्या-बाबतींत मोहनच्या बायकोची असावी. असो. आपल्याला काय करायचेंय्? पण असें कितीहि म्हटलें तरी मला कुठें तरी जखम झाली होती. ती अद्यापहि भरून येत नव्हती.

दारांतल्या मोठ्या लाखेच्या झाडाखालीं एक टांगा थांबला आणि आश्चर्य ! त्यांतून मोहन खालीं उतरला. झाकींत उतरला. माझा आठव त्याला कां बरें आला असावा ? मीं नौकरांना पाठविलें. वरूनच "या—" म्हणालों. जागचा उठलोंदेखील नाहीं. जिना वाजवीत तो वर आला.

" मधेंच बरा आलास ? " मीं उगाच कांहीं तरी विचारलें.

" सहज—" म्हणत अंगांतला कोट काढून त्यानें खुंटाळ्याला लावला. माझ्या बैठकीच्या खोलींत नजर टाकली. आणि एक नालायक प्रश्न केला.

" रेडिओ कुणाचा ? "

" चोरून आणलाय् ! " असें उत्तर द्यायचें अगदीं माझ्या ओंठा-वर आलें होतें, पण मी सावकाश बोललों,

" आपलाच. "

माझ्या घरीं रेडिओ असणें मोहनला फारसें आवडलें नसावें. त्याला तसें कां वाटलें, देव जाणे ! कष्टानें आल्यासारखा तो गॅलरींत

आला. खुर्ची ओढून बसला. माझ्या डब्यांतली सिग्रेट काढून त्यानें शिलगावली. कुजक्या स्वरांत विचारलें,

" पांच पांच पांच शिवाय ओढत नसशील ! चैन असते तुम्हां सिनेमांतल्या माणसांची. पण काय रे, हें कायम टिकणं कठिण, नाहीं?"

मला म्हणायचें होतें, " भल्या गृहस्था, तुला काय करायच्या आहेत या उठाठेवी ? झक् मारायला तूं आलास कां माझ्या घरांत ?" पण यांतलें कांहींच मी म्हणूं शकलों नाहीं. "हं—" एवढेंच पेन्शनराच्या स्वरांत म्हणालों आणि वांझोट्या ढगांची गर्दी नजरेनें हटवूं लागलों.

" एक काम होतं काशिनाथ तुझ्याकडे. " राख झाडीत मोहन म्हणाला.

" काय ? "

" लोखंडवाडीचं दुकान बंद केलं मी. "

" बरं—"

" करणपूरला टाकावं म्हणतों. "

" हं—"

" एक जागा मिळतेय् तिथं. "

" छान आहे ! "

" तुला पैसे खूप मिळतात. "

" हं—"

" एक हजारभर रुपये हवे आहेत. म्हटलं, तुझ्याकडे मिळतील."

त्याच्या या प्रश्नानें मात्र मला विलक्षण आनंद झाला. त्यानें माझ्याकडे पैसे मागावेत यांत माझा केवढा विजय होता ! बँकेंत पैसे असते तर मीं ताबडतोब चेक खरडला असता आणि म्हणालों असतों, " अच्छा, हे घे. " तो शरमिंदा झाला असता. मी पैसे दिले ही गोष्ट त्यानें त्याच्या उद्दाम बायकोला सांगितली असती. आणि तिचें नाकाचें टोंक जरा वाकलें असतें. पण दुर्दैव असें कीं, माझ्याकडे पैसेच नव्हते. मिळकतीसारखाच खर्चहि अवाढव्य होता. शिल्लक असणें मुष्किल.

" केव्हां पाहिजेत तुला पैसे? "मी बेफिकिरीनें विचारलें.

" आज आतां." तो ताडकन म्हणाला.

" आतां नाहीं जमणार गड्या." आतां—मधला 'ता' थोडा लांबवीत मी म्हणालों,

" पण पंधरा तारखेपर्यंत देईन. "

" मग असं कर ! "

" कसं ? "

" पुढच्या तारखेचाच चेक दे. तेवढ्यांत इथं न चुकतां पैसे भर म्हणजे झालं ! "

" ठीक." तसं करतां येण्यासारखं होतं, व मला त्याच्या बायकोचें नाक ओढून नीट करायचें होतें. मी ताडकन् उठून चेक खरडला. त्याच्या स्वाधीन केला. त्याच्या चेहऱ्यावर कसलेंच आश्चर्य उमटलें नाहीं. चेक घडी करून त्यानें आपल्या पाकिटांत व्यवस्थित ठेवला आणि वर मलाच म्हणाला,

" निश्चित भर बरं का. नाहीं तर माझी अडचण करशील, हो तुम्ही सिनेमांतलीं माणसं—–"

मला त्याच्या मगरूरीचा वारंवार संताप येत होता. पण त्याला कर्ज देण्यांत मला फार मोठें समाधान होतें. लहानपणीं दारिद्र्य भोगलेले असल्यावांचून त्या समाधानाची जातगोत ध्यानांत येण्यासारखं नाहीं !

" निश्चित रे. " असें मी म्हणालों, आणि चहासाठीं आंत ओरडलों.

चहा घेतां घेतां गप्पा निघाल्या. माझी पत्नीहि बाहेर येऊन बसली. माझ्या त्या बालमित्रानें मोठ्या रसाळपणें माझें लहानपणचें दारिद्र्य पुन: उगाळलें. माझ्या पत्नीला तें ऐकण्यांत कौतुक वाटत होतें, पण मला मात्र पाणउतारा झाल्यासारखें वाटत होतें. वीट येत होता. बरे दिवस आल्यावर माणसाला बालमित्र नको होतात त्याचें कारण मला त्यावेळीं पटलें.

दुसऱ्या दिवशीं परत एकदां "तारीख चुकवूं नकोस," असें बजावून ती वही निघून गेली.

त्याच्या चेकची तारीख मीं लक्षपूर्वक पाळली. चार दिवस आधींच पैसे भरून टाकले. चार दिवसांनीं बँकबुक भरवून आणलें. चेक पास झाल्याचें पाहिलें आणि सुटकेचा सुस्कारा टाकला. मात्र त्यानें पैसे पोंचल्याचें कळविलेंदेखील नाहीं. आभारप्रदर्शन करण्याची गरज तर त्याला नव्हतीच. तो माझा बालमित्र होता ना ! त्याच्या बायकोचें नाक सरळ झालें कीं नाहीं, कोण जाणें ! पण मला समाधान झालें होतें. हजार रुपयां-पेक्षां त्या समाधानाची किंमत फार मोठी होती. मी एका यातनेचा सूड घेतला होता.

चार सहा महिने झाल्यावर मी मोहनला एक पत्र लिहिलें. पैशाची परत मागणी केली. त्याचें उत्तर आलें नाहीं. दुसरें—तिसरें—चवथें—सात आठ पत्रें झालीं; पण गडीगुप्प ! उत्तर म्हणून नाहीं शेवटीं मीं चिडून लिहिलें. भेटींत बोलतां आलें नव्हतें तें सारें मीं पत्रांत लिहिलें. पण त्याचीहि दाद नाहीं. मी मनस्वी चिडलों. आणि आपण हजार रुपये रेसमध्यें घालवलें म्हणून गप्प बसलों. आपल्या कामांत गढलों. त्या व्यव-हाराची आठवणदेखील राखली नाहीं.

आठवण झाली ती त्यानंतर वर्षाभरानें. गांवाकडून भावानें पैशाची मागणी केली. तेव्हां माझ्याकडे पैसे नव्हते. मी खर्च अति करतों. पैशांचा सूड घेतों. शिल्लक टाकण्याइतकें भान मला रहात नाहीं. एके काळीं पैशांनीं माझा फार छळ केला आहे. मी त्यांची पत्रास ठेवीत नाहीं. पर्वा करीत नाहीं. भावाला जमिनीच्या कामासाठीं पैसे हवे होते.करणपूर आमच्या गांवालातालुका होता.मीं भावाला लिहिलें, " मोहन अभ्यंकरकडे पैसे आहेत ते घे.माझें पत्र दाखव."भावानें तसें केलें;पण मोहननें त्याला कांहीं दाद दिली नाहीं.पण माझा भाऊ खमंग. खेड्यांत वाढलेला ब्राह्मण तो. गांवगुंडी पचनीं पाडली होती त्यानें. भावानें मोहनच्या दुकानांतले कापड—गठ्ठे उचलले आणि घेऊन गेला. पण मोहनहि वस्ताद ! त्यानें भावावर फौजदारी केली. भावानें मला लिहिलें नाहीं. कांहीं तरी भानगड करून त्यानें स्वतःची मुक्तता

करवून घेतली. आणि मग साद्यंत हकीगत मला कळविली. मी चाट पडलों. केलें मात्र कांहींच नाहीं. निसुगच माणूस तो ! त्याच्याशीं कसला पत्रव्यवहार करायचा नि संबंध तरी काय ठेवायचा ?

अगदीं परवांपरवांची गोष्ट. तालुक्याच्या कचेरींत कांहीं महत्त्वाचें काम निघालें म्हणून मी माझ्या स्वतःच्या गाडींतून तालुक्याला, करणपूरला गेलों. तालुक्याचें काम आटपून मी उभ्या उभ्या गांवीं जाऊन परत फिरणार होतों. कचेरींतलें काम आटोपलें. अधिकारी मंडळींचा निरोप घेतला. गाडींत बसलों. ड्रायव्हरला खुणावलें. त्यानें गाडी सुरू केली.

" काशिनाथ " अशी हांक ऐकून मी गाडी थांबविली. बोलेतोंपर्यंत मला त्या माणसाची ओळखच पटली नाहीं. तो मोहन अभ्यंकर होता. मांजरानें नख्या लावून ओरबाडलेल्या खरबुजासारखें तोंड ! डोक्याच्या अगदीं मध्यभागीं चकचकीत टक्कल ! पान खाऊन खाऊन लाल झालेले दांत ! अंगांत एक हातधुलाईचा नेहरू सद्रा आणि पायांत पायजमा. सूट घालणारा माणूस खादीवांचून अन्य कसलाहि नेहरू सद्रा घालूं लागला कीं, त्याला दारिद्य आलेलें असतें असा माझा ठोकताळा आहे. मोहनचे दिवस खाचित फिरले होते. मला त्याची कींव आली नाहीं आणि चौकशीहि करावीशी वाटली नाहीं.

" केस रे कशानं गेले तुझे ?" उगीच आपलें मीं विचारलें.

" जोडे खाऊन. " भोपळ्या-बियांचे दांत दाखवीत तो कडू आवाजांत बोलला आणि जवळ येऊन त्यानें गाडीचें दार उघडलें. म्हणाला,

" गाडीवाला झाला आहेस तूं. म्हटलं ओळखतोस कीं नाहीं ? चल कीं घरीं."

" नको. मला घाई आहे."

" एक मिनिट. मंडळींनीं पाहिलं तुला नि मुद्दाम मला पाठविलं. म्हणाल्या, चहाला घेऊन या—"

पुनः सूडाची भावना. मनाला बरें वाटलें. बरेच दिवसांची जखम कोरडी झाली. मनानें मी त्या व्रणांवर बोट फिरविलें. बोटाला तो स्पर्श मऊ वाटला.

“ चल, इथं जवळच आहे.” मोहन अजीजीनें म्हणाला.

मी गाडींतून उतरलों नि त्याच्या मागें चालू लागलों. गल्लींतलीं पोरें आमच्याकडे एखाद्या सर्कशीची मिरवणूक पहातात तसल्या दृष्टीनें पाहात होतीं. मोहन अभ्यंकर एकाएकीं इतका खालीं कशानें आला तें मला उमगत नव्हतें.

बोळकांड्यांतल्या एका पडक्या वाड्यांत अंगणांतलीं डबकीं चुकवून आम्ही बिऱ्हाडीं आलों. आम्ही लहानपणीं रहात होतों त्याहूनहि ही जागा घाणेरडी होती. आम्हीं आंत शिरल्याबरोबर पोटें मोठीं झालेलीं पोरें “ पापाऽ ऽ ” करीत पुढें आलीं. त्या पोरांची किळस आली— कणवहि आली.

एका जुन्या छपरी पलंगावर पलंगपोस म्हणून जुनें धोतर आंथरलें होतें. मी पलंगावर टेकलों. मला तिथें बसावेंसें वाटत नव्हतें. मोहनकडून कांहींहि ऐकण्याची माझी इच्छा नव्हती. त्याच्याविषयीं माझ्या डोक्यांत चढलेला संताप सीमापार झाला होता. तो हलकट माणूस होता. नालायक होता. सहज उठता येईल इतपतच मी टेकलों होतों. त्याची बडबड चालू होती.

“ सारं गेलं. दुकानांत तोटा आला. घर गहाण पडलं. मुलं लहान असल्यामुळं विकतां येत नाहीं तें. म्हटलं, तूं मला पुढं उभा तरी करशील का? जोडे मारशील डोक्यांत—साऱ्या जगानें मारले त्यांत तुझा एक!”

तो भकास हसला. पानानें रंगलेले त्याचे हिडीस दांत जणूं माझ्या कानाचा चावा घ्यायला धावले. जें झालें तें बरें झालें असें मला वाटलें. मीं आंत पाहिलें. तिथें त्याचें स्वैंपाकघर होतें. त्याची बायको चहा घेऊन पुढें आली. घरांतील सर्वांपेक्षां तिची तब्येत चांगली होती. ती जरा स्थूलहि झाली होती. फरक इतकाच कीं, पूर्वी ती विकच्छ नेसत असे, ती सकच्छ नेसली होती. नाकाचा शेंडा तसाच वर होता. तिच्या चेहऱ्यावर कसलाच भाव नव्हता. डोळ्यांतले विचार दुर्बोध होते. तिनें चहाचा पेला माझ्या हातीं दिला आणि अगदीं कोरड्या आवाजांत विचारलें,

" ओळखलंत का ? "

सूडासाठीं हात उगारलेलें माझें मन चरकलें. मला बसवेना. चहा पिववेना. ती एनॅमलची रोगण उडालेली कपबशी. तो निळाकुट्ट चहा. कसेबसे मी दोन घुटके घेतले. आणि " येतों " म्हणून उठलों. मला माझें या गांवांत भोगलेलें लहानपण आठवलें. दारिद्र्याच्या यातना स्मरल्या. हात चुळबुळूं लागले. काळजांत कालवाकालव झाली. काळ केवढा समर्थ आहे ! होत्याचें नव्हतें करून टाकतो. मोहन आणि त्याची ती बायको— नाहीं म्हटलें तरी त्यांना ती शिक्षा योग्यच होती. पण—हीं मुलें ! मला वाटलें, त्या मुलांचे हातावर कांहीं द्यावें. बिचाऱ्यांचें दिवसाचें रेशन तरी भागेल. पण नाहीं. करुणेच्या कचाट्यांत न सांपडण्याचा आतां मला सराव आला होता. अनुभवानें मला खूप शहाणें केलें होतें. खिशांतल्या खिशांत उचलेली नोट मीं परत ठेवली आणि त्या दोघांकडेहि न पाहतां नुसतें " बरें येतों " म्हणून सटकलों. उंबरा गांठला. मोहन पाठोपाठ आला,

" काशिनाथ—"

मी थांबलों.

" अन्नाची भ्रांत झाली आहे. कर्जें फार झालींत. तुझ्याकडे येणार होतों मागायला. पण मन धजेना—म्हटलं. हिला पाठवावी. हिला दिलें असतेस तूं...! "

मीं मागें वळून पाहिलें. त्याची बायको हसली. वाईट हसली. तीसुद्धां पान खायला शिकली असावी...आणि...

" हिला दिले असते तूं...हो...तूं सिनेमांतला माणूस... तेव्हां..."

त्यानें आपल्या दोन्ही हातांत कसल्या तरी अदृश्य ओ याची चाळवाचाळव केली. बोटें दुमडलीं...विलक्षण दृष्टीनें माझ्याकडे पाहिलें... आणि तो हसला. छेः ! भयंकर...असह्य...मला क्षणहि थांबवलें नाहीं... दारिद्र्यानें एवढा अधःपात होतो ?—होत असेलहि. मागें वळून न पाहातां मी तिथून निसटलों. आणखीन एक क्षण थांबलों असतों तर मला भोंवळ आली असती.

• • •

## मावशी परत आल्या; पण—

३

प्लेगची साथ आल्याची आंवई जोरांत उठली. एक दोघांच्या—घरांत उंदीर पडले, आणि गांवकामगारांनीं दवंडी पिटवली. राजुरी गांव फुटला. गांवापासून दूर प्रत्येकजण आपल्या शेतीवाडीवर जाऊन राहिला. चौकीवरचे पोलिस शिपाई आणि रखवालीचे रामोशी यांच्यावांचून चिटपांखरूंहि गांवांत राहिलें नाहीं. महालकऱ्यांची कचेरीदेखील नदीपलीकडच्या सरकारी बंगल्यांत भरूं लागली.

माझे वडील महालकऱ्यांच्या कचेरींतच कारकून होते. सर्वांबरोबर आम्हांलाहि गांव सोडणें भाग होतें. पण आमचें कुटुंब त्या गांवांत उपरें. गांवांत घर नाहीं, रानांत शेत नाहीं, अशी अवस्था. जाणार कुठें ?

माझ्याबरोबरीचीं शाळेंतील मुलें रानांत रहायला गेलीं होतीं. गांव सोडून रानांत रहायला जायची कल्पना मला मोठी मौजेची वाटत होती. भीत भीत मीं वडलांना विचारलें,

" दादा, आपण कधीं रानांत रहायला जायचं ?"

त्यावर नेहमींच्या बैरागी शांतपणानें ते उत्तरले,

" प्लेग होणारच असेल तर तो गांवांत झाला काय अन् रानांत झाला काय, सारखेंच. "

वडिलांचें उत्तर मला आवडलें नाहीं. मी खट्टू झालों. आणि जेव्हां डोळे गाळीत आईनें मला सांगितलें, " बाबा रे रानांत रहायचं

म्हणजे झोंपडी बांधण्यापुरते तरी पैसे हवेत गांठींशीं ! " तेव्हां मात्र माझी पूर्ण निराशा झाली. पण नेमकें ह्याच वेळीं शेजारच्या मावशी आमच्या घरीं आल्या. त्यांनीं आईला आग्रह केला,

" आमच्याबरोबर चला. चार कच्चींबच्चीं आहेत, गांवांत राहूं नका. धोका आहे. झोंपडी काय—आमचा एवढा खटला आहे त्यांत तुमच्यासाठीं बांधतील चार आकणीं. "

आईचे डोळे पाण्यानें भरले. मला तर वाटलं, पळत जाऊन मावशींच्या गळ्याला मिठी मारावी.

नेहमींप्रमाणें मावशींचें म्हणणें आईला मोडवलें नाहीं, आणि आम्हीं मावशींच्या ' बामणकी ' नांवाच्या रानांत रहायला गेलों.

मावशींच्या उदार स्वभावानें असें कैक वेळां आमच्या कुटुंबाला ऋणी करून ठेवलें होतें. आम्हींचसें काय, पण उभ्या राजुरी गांवांतलें एकहि गरीब कुटुंब मावशींच्या उदारपणाच्या सांवलींत विसांव्याला आल्यावांचून राहिलें नव्हतें.

मावशींच्या वयानें चाळिशी कधींच उलटली होती. सुखासीनतेनें त्यांच्या बांधेसूद अंगलटीला थोडका स्थूलपणा आला होता, तरी कांती-वरची लाली अद्याप निवली नव्हती. सर्वांशींच बोलतांना त्या, लहान मुलाशीं बोलावें तशा, समजावणीच्या सुरांत बोलत. चालतांना थोड्या वेगानें चालत. त्यांच्या जोडव्यांचा गंमतीदार आवाज होई. कुरळया केसांचा वांकडेपणा त्या कटाक्षानें काढून टाकीत आणि कुंकूं ठसठशीत लंबवर्तुळाकार लावीत. त्यांच्या चेहेऱ्यावर सदैव वात्सल्य टवटवलेलें दिसे. पण त्यांची कूस मात्र कधींच मोहरली नव्हती. त्यांना संतान नव्हतें.

घरांत बारा गांवांचें वतन. शें-दोनशें एकर जमीन. गुरेंढोरें. गडी-माणसें. फार मोठा पसारा. बागाइतांतले नुसते कांदेच आले तर चार खणांची खोली भरून जाई. घरांत माणसेंहि पुष्कळ. मुलें, पुरुष, स्त्रिया. पण योगायोग असा, सगळाच जमाव विस्टकलेला. कुणाचे वडील जिवंत आहेत तर आई गेलेली; दोन भावंडें आहेत, पण तीं सावत्र;नवरा-बायको

आहेत. पण बायको दुसरेपणाची. हा सारा मावशींच्या दीरजावांचाच विस्तार, स्वतःला संतान नाहीं म्हणून मावशी कधीं कष्टी नसत. त्या साऱ्यांचें करीत. मनापासून करीत. आईच्या मायेनें करीत. या सगळ्या उसाभरींतच आमच्यासारख्या गवार शेजाऱ्यांची वर्दळ. गांवांतील गोर-गरिबांचा त्रास. पण मावशीं कधीं कंटाळत नसत. त्या आपल्या धांवत्या गतींत काम करीत रहातील. सकाळीं कोट-टोप्या शोधून शाळकरी पोरें मार्गाला लागतील. त्याच वेळीं शेतावरील गड्यांच्या भाकरी बांधून देतील. आणि तेवढ्यांतच लगबगीनें मागच्या दारीं जाऊन झाडलोटीच्या जिजा महारणीच्या पदरांत ताजी भाजी, जोंधळ्याची भाकरी टाकतील. मावशी म्हणजे त्या घरची लक्ष्मी होती. ‘ विरळा ’ म्हणावें, त्या जातींतील एक देवमाणूस होतें.

मावशीच्या कृपेनें आम्ही त्यांच्या मळ्यांत रहायला आलों होतों. प्लेगमुळें शाळा बंद होत्या. तशांत दिवसहि उन्हाळ्याचे. आम्हांला खेळा-यला चारी बाजूंना रान मोकळें होतें. मावशींच्या घरातील दहाबारा पोरें आणि आम्हीं चारपांच भावंडें साऱ्या रानभर धूडगूस घालीत होतों.

मावशींची सोनी, हें एक चांगलें खेळणें आम्हांला मिळालें होतें. सोनी मावशींच्या धाकट्या दिराची मुलगी. तिची आई तिच्या लहानपणींच मारली होती. सावत्र आई तिच्या वडिलांच्याबरोबर त्यांच्या नोकरीच्या गांवीं असे.

मावशींची माया घरांतल्याच काय, बाहेरच्या आम्हां मुलांवरसुद्धां सारखीच असे. पण त्यांतहि थोडें डावें–उजवें होतें. निदान सोनीवर तरी त्यांची माया जरा अधिक असल्यासारखें दिसे. तिची वेणीफणी, खाणेंपिणें या बाबतींत त्या अधिक दक्षता घेत. तिचें कांहीं दुखलेंखुपलें तर मनस्वी कष्टी होत. ढणढणत्या दिव्याबरोबर तिच्या उशाशीं रात्र जागत. सुचतील त्या आणि कोणी सुचवील त्या डॉक्टर–वैद्याला आणवीत. तिचें दुखणें निवारीत. जणूं दुरून बघणाराला वाटावें, वाड्यांतील साऱ्या पोरवड्यांत सोनीच काय तें मावशींचें औरस संतान आहे.

सोनी वयानें तेरा चौदा वर्षांची होती. रूपानें नक्षत्रासारखी, गोरा गव्हासारखा रंग, सडसडीत, किंचित् उंच बांधा. लालचुटुक ओठ. सरळ रावूसारखी टोंच असलेलें नाक. रुंद कपाळ. काळे, काळे, कुरळे विपुल केस. नाहीं म्हणायला तिच्या मोठमोठ्या निळ्या डोळयांत कांहीं चमत्कारिक झांक दिसायची.

वेणीफणी करून झाल्यावर सोनी हुंदडत बाहेर गेली म्हणजे मावशी बसल्या जागींच थोडा वेळ बसून रहात. त्यांच्या त्या कनवाळू डोळयांत सोनीच्या डोळयांतील चमत्कारिक झांक चमकून जाई. पापणी न मिटतां त्या तशाच बसून राहिल्या कीं, त्यांचे डोळे कांठोकांठ भरून येत. नाकाच्या पाकळ्या थरथरत. खालचा ओठ वरच्या दातांखालीं दुमडला जाई. तेवढ्यांत "काके–काके" करीत एखादा पुतण्या त्यांच्या पाठीशीं बिलगला म्हणजे मावशी भानावर येत. पुनः आपल्या कामाला लागत. सोनीच्या भवितव्याचीं चित्रें त्यांच्या डोळयांपुढें येत. त्या आपल्यापरीनें तीं चित्रें सुखद रंगविण्याचा प्रयत्न करीत, आणि कसले तरी काळेकुट्ट ढग त्यांच्या नजरेसमोर गर्दी करीत. सारीं चित्रें धुवून पुसून जात. पाणीच पाणी होई. डोळयांत सांचलेले अश्रू पदरानें पुसून टाकून मावशी पुनः स्वतःला संसाराच्या रामरगड्यांत गुंतवीत.

घरांतील बाकीचीं माणसें, इतकेंच काय गडीमाणसेंसुद्धां, सोनीला हिडीसफिडीस करीत. मावशी आसपास नाहींत याची खात्री करून घेऊन तिला एखादा टोलादेखील हाणीत. असें कांहीं झालें म्हणजे सोनी जोरानें किंकाळे आणि गुरासारखी ओरडत तोंडावर हात घेत ओव्यापासून स्वैंपाकघरापर्यंत–" काकी, काकी–" ओरडत धांवे. तिचा असा आवाज ऐकला कीं मावशी हातचें काम टाकीत. तिला जवळ घेत आणि म्हणत,

"असं ओरडूं नये सोन्या, तूं आतां लहान नाहींस."

मावशींचा पदर डोळयाला लागला कीं सोनीचें रडें आटून जाई. आढ्याकडे पहात ती खदखदून हसे. स्वतःच्याच पालथ्या मनगटाचा चावा काढी आणि पुनः वांकडीतिकडी धांवत सुटे. तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पहात मावशी पुनः कष्टी होत. आणि स्वतःच स्वतःला दिलासा देत,

'मुक्यालासुद्धां वाचा देतो दव. सोनीचं कां नाहीं भलं करणार तो ?'

एखाद वेळीं सोनी कांहीं भलत्याच खोड्या करी. एकदां माजघराच्या जात्याचें उसें करून दुपारच्या वेळीं मावशी आडव्या झाल्या होत्या. सोनी कुठून तरी आली आणि तिनें कापड कातरायच्या कात्रीनें मावशींच्या केसांची एक बटच कापून टाकली. मावशी चटकन् जाग्य झाल्या. केसांची ती बट आणि कात्री मावशींच्या पुढें नाचवीत कुत्रें रडावें तसा आवाज काढून सोनी हसूं लागली. अहेवपणा हें परम भाग्य मानणाऱ्या मावशी कांहीं अशुभ कल्पनेनें विलक्षण चमकल्या. त्यांचा राग अनावर झाला आणि " सटवाई, काय केलंस हें ? " म्हणत त्यांनीं सोनीच्या मुस्कटांत मारली. सोनीनें एवढा गळा काढला. स्वतःचीं मनगटें चावून घेतलीं. तोंडावर पालथा हात घेतला. मावशींचें काळीज पुनः हललें. तात्यांचें, मावशींच्या यजमानांचें, जीव घेणें टॉयफॉइचें दुखणें त्यांना आठवलें. त्यांच्या सर्वांगाला दरदरून घाम सुटला. अंगांत कांहीं संचारावें तशा त्या उठल्या. कोनाड्यांतील फणेरीची पेटी घेऊन पटकन् तिच्यांतला आरसा त्यांनीं उभा केला. बाहेरून तात्यांचा आवाज आला.

"काय झालं ग सोन्या ? "

त्या खणखणीत आवाजासरशीं मावशींचें काळीज स्थिरावलें. आपल्या कपाळींच्या कुंकवाचें प्रतिबिंब नंदादीपाच्या ज्योतीसारखें तेवत असल्याचा त्यांना भास झाला. चिमटीनें कुंकू घेऊन त्यांनीं भरवासपणें कपाळाला लावलें. तात्यांच्या आवाजानें क्षणभर दबलली सोनी पुनः जोरानें किंचाळली. मावशींनीं मागें वळून पाहिलें. सोनीनें आपल्या डोक्यावरचे अर्धे अधिक केस कात्रीनें कापून घेतले होते. मावशी पटकन् उठल्या. कांहीं न बोलतां त्यांनीं तिच्या हातांतील कात्री हिसकून घेतली. भुकेनें रडत असलेल्या एखाद्या तहान्या मुलाला आईनें पदराखालीं घ्यावें तसें सोनीला छातीशीं धरलें आणि पाठीवर हलके हलके थोपटीत त्या म्हणाल्या,

"

" असं करूं नये."

" मग तूं आम्हाला मारलंस कां ? "

"आतां नाहीं हं. पुनः कध्धीं कध्धीं मारणार नाहीं माझ्या सोन्याला."

मावशींनीं सोनीला आणखीन् जवळ ओढलें. स्वतःचें मनगट चावून घेऊन आढ्याकडे पहात सोनी हसूं लागली. मावशींनीं लाडीगोडीनें तिच्या हातांतील कात्री काढून घेतली आणि माजघरच्या अधिक अंधाराच्या जागेंत तिला त्या घेऊन गेल्या.

सोनीच्या वेडेपणाच्या गोष्टी त्या कुणाहिजवळ कधींहि बोलत नसत. तिच्या केसांच्या बाबतींतहि त्या चक्क खोटें बोलल्या. घरांतहि अन् गांवांतहि त्यांनीं सांगितलें,

" नाहीं नाहीं त्या ओंगळ मुलींत मिसळते. डोक्यांत खवले झाले होते म्हणून केस कमी केले ! "

मावशींना खोटें तरी कोण म्हणणार ? पण सोनीचा वेडेपणा त्यांनीं कितीहि लपविला तरी घरांतील सारीं माणसें, आम्ही शेजारी-पाजारी आणि सारा गांव तिला वेडीच म्हणत असूं.

रानांत रहायला आल्यानंतर वेडी सोनी हा आम्हां मुलांच्या खेळण्याचा एक प्रमुख विषय बनला. दगडाखालचे विंचू धरून त्यांच्या नांगीला आम्ही दोरी बांधायचे. विंचू घेऊन आम्ही तिच्या मागें धांवायचें. विंचवाच्या भीतीनें तोंडावर हात घेत ती रानभर पळायची. आजूबाजूच्या वस्तीवरले लोक हसत; आम्हांला मौज वाटे.

सोनीची तशी दशा झालेली पाहून मावशींना वाईट वाटायचें. त्या आम्हांला बोलायच्या नाहींत, पण माझ्या आईजवळ मोठ्या काकुळतीनें सांगायच्या,—

" इंदिराबाई, तुमच्या मुलांना सांगा कांहीं तरी. लहानपणींच तिला बिचारीला बालग्रह झाला. डोक्यावर परिणाम आहे तिच्या. पण मोठी झालीय् ती. तिची अशी चेष्टा करणं बरं नाहीं. नाहीं का ? "

आईला सोनीबद्दलची मावशींची तळमळ चांगली माहीत होती. ती आम्हांला दटवायची. आम्ही दोन दिवस गप्प बसायचे.

वैशाखाचें ऊन मी म्हणत होतें. दूरवर पसरलेल्या काळ्या नांगरटींतून, तापलेल्या तव्यांतून वाफ निघावी तसें पारदर्शक लव्हाळयाचें पीक निघत होतें. वाऱ्याची चाहूल नसतांहि वांकडेतिकडें हलत होतें. पाठीमागची करंजाचीं झाडीं त्यानें कधीं झांकली जाई, कधीं मावळी जाई. तापलेल्या ढेकळावर पाय पडला तर तो काळा ढेकूळ रसरसलेल्या इंगळासारखा डसे. पळाणीवरच्या जांभळीखालीं बैलांनीं मेठा मारला होता. धामाघूम झालेले गडी मुंडाशीं उशाला घेऊन घोरत पडले होते. दोन्ही झोंपड्यांतील वडीलधारीं माणसें दुपारच्या ग्लानींत बुटमळलीं होतीं. आम्हां मुलांना मात्र हुंदड्या घालायची लहर आली होती.

झोंपड्यांपासून शंभर—दोनशें कदमांवरच मोठी विहीर होती. उभ्या रानांत विहिरीजवळचें एक खुटणच काय तें हिरवेंगार आणि ओलें होतें. तिथें एक केळीची बाग होती. केळीच्या वाफ्यांतला गारवा मोठा सुखद असतो. अशा दुपारीं रानांतलीं आडमुठीं कुत्रींदेखील केळीच्या वाफ्यांत 'ल्हा—ल्हा' करीत पडलेलीं असतात,

फारसा आवाज न करतां आम्हीं केळीच्या बागेंत जायचें ठरवलें. एक गुपचूप धूम ठोकली. पायाचे चटके चुकवीत चुकवीत हरणउड्या मारीत आम्हीं केळीच्या बागेंत पोहोंचलों. हिरव्या मिरचीच्या चटणीनें तोंड भाजल्यावर, अधाशीपणानें प्यालेल्या गार पाण्याच्या घोटानें ओठांची जी अवस्था होते ती अवस्था आमच्या अनवाणी पायांची झाली.

केळींना नुकतेंच पाणी दिलें होतें. केळींच्या मोठमोठ्या पानांची सांवली आणि मवून मवून वाढलेल्या झुबकेदार शेवरींच्या छाया यांत आमच्या बालक्रीडा सुरू झाल्या. चार-दोन केळफुलें झाडांवरून खालीं आलीं. त्यांचे पंख उपसले गेले. केळीच्या सोपटांनीं त्यांना पायाशीं बांधून कुणी बूट घातल्याचा आनंद घेतला. लटकत्या लोंगरांतलें हिरवें केळें मोडून कुणी त्याचा चोथा थुंकला. त्याला ना चव ना धव! पोस्टाच्या

पाकिटाच्या झांकणाऱ्या कंगोऱ्यांवर जीभ फिरवल्यावर जसें वाटतें तसें त्यांना वाटलें असेल.

हा प्राथमिक खेळ संपल्यावर कुणाच्या तरी सुपीक डोक्यांतून नाटक करण्याची कल्पना निघाली. केळीच्या बनांत असल्यामुळें कीं काय, पण पांडव–वनवासाचा कथाभाग वठविण्याचा बेत कायम झाला. एवढ्यांत आमचा मागोसा घेत वेडी सोनी तेथें घेऊन पोहोंचली. डाव्या मांडीवर शड्डु ठोकीत शेजारच्या मळ्यांतील बाप्या जरंडीकर ओरडला,

" मी भीम !"

" आणि सोनी हिडिंबा !" सोनीला साजेशी भूमिका मावशींच्या पिल्यानें सुचवली. झालें. ठरलें. सोनी हिडिंबा ! मागचापुढचा कथाभाग विचारबाह्य ठरवून एकदम भीम आणि हिडिंबा यांच्या लग्नाचा समारंभ सुरू झाला.परकराचे ओंचे वर धरून फिरणाऱ्या सोनीला चारपांच जणांनीं पकडलें. " हिडिंबा, हिडिंबा, हिडिंबा !" असा एकच गिल्ला केला.

सोनीला कसला आनंद झाला, कुणाला ठाऊक ! ती एकाएकीं खदखदून हसूं लागली. आनंदाच्या भरांत तीनचारदां तिनें आपलें मनगट कराकर चावून घेतलें.

तरवडाच्या फुलांना सोपट्याच्या गांठी मारून मुंडावळ्या बनविल्या गेल्या. बाप्या जरंडीकर आणि वेडी सोनी नवरानवरी झालीं. सारी तयारी झाली. आतां लग्न लागणार तेवढ्यांत केळीच्या बुंध्यांत गारव्याला बसलेल्या एका दुष्ट बेडकीनें नवरीच्या पायांवर झेंप घेतली. सोनीनें भयंकर आरोळी ठोकली. तोंडावर हात घेतला. दोनतीन वांकड्यातिकड्या उड्या मारल्या तोंडावर हात बडवीत तिनें झोंपडीकडे पळ काढला.

तसल्या वेड्यावांकड्या मुंडावळ्या बांधलेली सोनी झोंपडींत शिरली, मावशींच्या पुढ्यांत जाऊन उभी राहिली. झोंपडींत तात्पुरत्या तयार केलेल्या आडोशाला बसून मावशी डोळ्यांना पाणी लावीत होत्या. त्यांनीं वळून सोनीकडे पाहिलें.

"सोन्या!" एवढेंच म्हणून त्या पुढें आल्या. सोनी धांवत जाऊन त्यांना बिलगली. तिचें ओरडणें किंचित् आकसलें. मावशी म्हणाल्या, "ओरडूं नकोस. तुझे काका झोंपले आहेत बाहेर."

तशी सोनी गप्प झाली. दोनहि हातांनीं तिचें मस्तक आपल्या समोर धरून मावशी तिला न्याहाळूं लागल्या,—सोनीच्या कपाळावर मुंडावळ्या! सुखदु:खाची एक संमिश्र लहर मावशींच्या सर्वांगांतून तरतरत गेली. त्या अत्यंत अस्वस्थ झाल्या. त्यांनीं आपल्या लुगड्याची चौपदरी जमिनीवर टाकली. त्यावर लहान मुलासारखें सोनीला निजवीत त्या म्हणाल्या, "दुपारच्या वेळीं बाहेर कशाला गेलीस उन्हांत? अं? चल झोंप. झोंप."

मावशीकडे टक लावून पहात सोनी उगीचच हसली. तिनें डोळे मिटून घेतले. मावशी तिला थोपटूं लागली. उन्हानें लाल झालेल्या सोनीच्या कानशिलावर हळुवारपणें मावशींचा हात पडूं लागला. मात्र त्यांच्या कानांत सनई-चौघड्यांचे सूर घुमत होते. डोळयांसमोर लग्नमंडप दिसत होता. सोनी शहाणी झाली होती. अष्टपुत्री नेसली होती. हाळदुल्या अंगानें मुंडावळ्या बांधून कुलस्वामीचें स्मरण करीत बोहल्यावर उभी होती. अंतरपाटापलीकडे एक प्रसन्न चेहऱ्याचा देखणा तरुण...

कानशिलावरचा मावशींचा हात खालीं ओढून सोनीनें त्यांचें बोट करकरून चावलें आणि ती "ई ऽऽ" करून ओरडली. मावशी क्षणभर स्तब्ध झाल्या. त्यांनीं सोनीच्या डोळ्यांत पाहिलें. आणि एकदम हुंदका आल्यासारखें होऊन त्यांनीं सोनीच्या गालांवर आपला गाल घांसला. बारक्या आवाजांत त्या पुटपुटल्या,

"सोन्या काय रे पाप केलं होतंस देवाच्या घरीं?"

संध्याकाळीं वारवशी बसल्या बसल्या दुपारची ही कहाणी मावशीनीं माझ्या आईला सांगितली. सांगतांना त्यांचे डोळे पाझरत होते. गालांवरून अश्रूंचे ओघळ वहात होते.

"इंदिराबाई, माझ्या सोनीनं मुंडवळ्या बांधलेल्या खरंच कधीं बघीन का हो मी?"

माझी आई तरी काय सांगणार ? सोनीचें लग्न ही गोष्ट असंभवनीय होती. जाणून बुजुन वेड्या मुलीला कोण पदरांत घेणार ?

" होईल हो, अजून लहान आहे. मोठी झाल्यावर तिची तिलाच समज येईल." एखाद्याच्या शोकसमाचाराला गेल्यावर आपण कांहीं तरी बोलतों तशी आई बोलली. पण त्यामुळें मावशींना केवढा मोठा धीर आला ! त्यांनीं पदरानें डोळे कोरडे केले. नाकांतून ओला श्वास वर ओढला. थकल्यासारखा एक हुंदका त्यांच्या तोंडांतून बाहेर पडला. भाबड्या आशावादाला वाचा फुटली,

" एका ज्योतिष्यानं तिचा हात पाहून सांगितलंय् कीं सोळाव्या वर्षापासून सोनीला कळूं लागेल. तिचं लग्न होईल. मात्र नवरा बिजवर मिळेल. मिळेना बापडा. सोनी शहाणी झाली तर त्याचा संसार सुखानं करून दाखवीन. नाहीं का हो ? तसं तिला पुष्कळ कळतं. सकाळीं आठला तिला दूध प्यायची संवय आहे. ठरल्या वेळीं नाहीं मिळालं तर थैमान घालते. वेडी म्हणावी तर हें कसं कळतं हो ? "

मावशी शून्याच्या पाठीमागें एकदोन आंकडे घालीत चालल्या होत्या. माझ्या आईच्या डोळयांत आश्चर्य दिसत नव्हतें. तिला मावशीची कींव येत होती. कांहीं तरी दैवी चमत्कार होऊन सोनीचें लग्न मावशीला पहायला मिळावें असेंच तिला वाटत होतें.

सोनीच्या लग्नाची कल्पना एका मावशीवांचून कोणाच्याहि डोक्यांत नव्हती. मावशी मात्र सोनीपेक्षांहि त्या कल्पनेचे लाड अधिक करीत होत्या. आणि सोनीला सोळावें कधीं लागतें याची वाटच पहात होत्या.

एखादें दिवशीं आरशापुढें उभें राहून सोनीनें केसांतून फणी फिरवली तरी मावशी हातांतलें काम टाकून आमच्याकडे येत. आईला सांगत, "इंदिराबाई, सोनीनं स्वतःची वेणीफणी स्वतःच केलीन् बघा हो !"

" शहाणी आहे हो ती. अजून पोरवय आहे एवढंच. " आई तरी आणखीन् काय म्हणणार ?

प्लेगची साथ जिरली. आम्ही परत गांवांत रहायला आलों. शाळा सुरू झाल्यामुळें आतां सोनीच्या वाटे जाणें आम्हांला फारसें साधत नव्हतें.

दिवस जात होते आणि सोनीला शहाणपण येत असल्याचें साक्षात्कार मावशींना वारंवार होत होते. आज काय सोनीनें स्वतःचा परकर स्वतः धुतला, स्वतःचें उष्टें उचललें,—इतक्या लहानसहान गोष्टींतसुद्धां मावशींना सोनीच्या लग्नाची शक्यता दिसूं लागली. आणि न राहवून त्या तसें माझ्या आईजवळ पुन. पुनः बोलूनहि दाखवूं लागल्या.

थोड्याच दिवसांत मावशींच्या घरीं पाहुणे आले. मुलीला पहाण्यासाठींच आले. मात्र सोनीला पहाण्यासाठीं नव्हे. जवळजवळ सोनीच्याच वयाची मावशींची दुसरी पुतणी सुलभा हिला पहाण्यासाठीं. लग्न सुलभेचें जुळत होतें आणि मावशींच्या मनीं सोहळा सजत होता सोनीच्या लग्नाचा !

पडवींतील बैठकीवर सुलभाची वधूपरीक्षा चालू झाली होती. तात्या काका, आप्पा एका बाजूला बसले होते. मुलें फारशीं घरांत नव्हतीं. माजघराच्या दारांत मावशी आणि आई यांच्यामधें मी अंग चोरून उभा होतों.

पाहुण्यांनीं सुलभाला गाणें म्हणायला सांगितलें. ती गाऊं लागली.

तिचा गळा गोड होता. गाणें देवधरांचें होतें. पहायला आलेल्या वयस्कर पाहुण्यांच्या चेहेऱ्यावर व मानेच्या हालचालींत पसंती दिसत होती. गाणें संपत आलें. पाहुण्यांचें मत आतां कळणार, एवढ्यांत कुत्रें रडल्यासारखा आवाज काढून हसत हसत सोनी परसदाराकडून धांवत आली. मला दूर सारून आई आणि मावशी यांच्यामधून सपाट्यानें बैठकीवर गेली. बैठकींतली सारीच मंडळी एकदम चमकली. साऱ्यांनीं माना खालीं घातल्या. मावशींच्या अंगाला दरदरून घाम सुटला. आईच्या तोंडांतून " अरे देवा ! " एवढेच शब्द उमटले. मी खुद्‌कन् हसलों. बैठकीच्या अगदीं मध्यभागीं सोनी उभी होती. तिच्या अंगावर बोटभर देखील वस्त्र नव्हतें. तात्या पटकन् उठले त्यांनीं आपलें उपरणें तिच्या अंगावर टाकलें. तिला दारांतून आंत लोटलें.

सुलभेचें लग्न मोडलें. केवळ सोनीमुळें मोडलें. पहायला आलेल्या पाहुण्यांनीं चक्क सांगितलें, "तुमच्या घरांत वेड आनुवंशिक दिसतंय्. सोयरीक कर्तव्य नाहीं."

तेव्हांपासून सोनीला 'खाऊं का गिळूं" असें साऱ्यांना झालें. पण मावशींच्या मायेच्या तटबंदीमुळें कोणाचेंहि दुष्ट हात सोनीपर्यंत पोहोचूं शकलें नाहींत. सारें घर सोनीचा राग राग करूं लागलें. तिला पाण्यांत पाहूं लागलें.

मावशींची अवस्था मोठी केविलवाणी झाली. त्या माझ्या आईजवळ येऊन रडल्या. देवघरांत सोनीला पोटाशीं धरून रडल्या. तिन्हीसांजच्या शंकराच्या देवळांत जाऊन रडल्या.

एवढी गंगामाई वाहिली तरी सोनीच्या नशिबाचा पालथा घडा ओलावला नाहीं. भीत भीत घरांतील माणसें मावशींना सुचवूं लागलीं, "सोनीला वेड्यांच्या इस्पितळांत पाठवलें पाहिजे."

मावशी निरुत्तर झाल्या. नाहीं म्हणाल्या नाहींत कीं होय म्हणाल्या नाहींत.

वर्ष दीड वर्ष निघून गेलें, पण सोनीचें शहाणपण कुणाला पटलें नाहीं. 'वेडी, वेडी' असेंच सारीं जणें म्हणत तिला दूर लोटीत.

असह्य झालेला मनस्ताप मावशींच्या छातींत कोंडला जाईना. मावशींना सपाटून ताप भरला. सारें घर घाबरलें. डॉक्टरांची ये-जा सुरु झाली. नाना औषधोपचार झाले. कांहीं दिवसांनीं मावशींना किंचित् आराम पडला. त्या हिंडूं फिरूं लागल्या. पण त्यांचा स्वभाव त्रासिक झाला. कधीं नव्हे तें त्या तुसडेपणानें बोलूं लागल्या साऱ्यांना. झिडकारूं लागल्या. एका सोनीशिवाय कोणाकडेहि लक्ष देईनाशा झाल्या.

पूर्वीप्रमाणेंच त्या घरकाम करीत होत्या. पण त्यांत पूर्वीचा वेग नव्हता; उत्साह नव्हता. जणूं सारें कर्तव्याच्या पोटीं चाललें होतें.

सोनीचे मात्र त्या अधिक लाड करूं लागल्या होत्या. घरांतील कुणालाहि मावशींच्या वागण्याचा अर्थ समजत नव्हता. मावशीहि आपलें दु:ख मुक्यानें वागवीत होत्या.

अश्रूंची वाट आतां कोरडी ठणठणीत झाली होती. त्यांना रडूं येई-नासें झालें होतें. त्यांच्या कोरड्या ठणठणीत डोळ्यांसमोर कधींमधीं वेड्या आशांचें मृगजळ उठे. मावशींचें मन हरणाच्या वेगानें त्यामागें धांवे. निराशेनें विफल होई. जागच्या जागीं पाय खुडे. तळमळे.

उभ्या असत तेव्हां मावशी काम करीत, पण पावलापावलावर कण्हत दीर्घ निःश्वास टाकीत. अंथरूण धरत तेव्हां जवळपास कुणालाहि फिरकूं देत नसत. एकट्या सोनीला जवळ घेत. तिच्याशीं कांहीं बोलत नसत. नुसत्या पहात रहात. सोनी कांहीं वेळ त्यांच्या उशाशी बसल्या-सारखें करी आणि मध्येंच कुत्रे रडल्यासारखें हसे. पालथें मनगट चावी. लू–लू तोंडावर हात घेई. मग मात्र मावशींना कोरडे हुंदके अनावर होत. निजल्या जागीं त्या पालथ्या होत. दुःख दडविण्याचा सहन, करण्याचा विफल प्रयत्न करीत.

स्त्रीसुलभ लज्जेनें मावशींनीं आपलें दुखणें सहा महिने लपवलें. सोनीला सोळावें वर्ष लागलें. मावशींच्या आशेला तिच्यांत निश्चित सुधार-रणा दिसूं लागली. माजघरांतल्या घुसळखांबापाशीं मावशी झोंपत आणि मावशींकडून आपली शुश्रूषा करून घेत. मावशींच्या उजव्या स्तनाभोंवतीं सोनी अलगद बोटांनीं वर्तुळें काढीत बसे. मावशींच्या वेदना थोड्या सुसह्य होत. त्यांना बरें वाटे.

स्तनावर झालेलें गळूं आंतल्या आंत विस्तारत होतें. मावशींना वेदना असह्य होत होत्या. दुःख आणि निराशा यांची गुंतवळ कुणी तरी पिंजत होतें. मावशींच्या हृदयाला ठणका सोसवत नव्हता अर्भकाच्या ओठीं जाण्याचें भाग्य मावशींच्या स्तनांना लाभलें नव्हतें. स्त्री जातीला ईश्वरी प्रसादानें मिळालेला अमृतसंचय जिथें सांठायचा तिथें आज असंख्य वेदना सांठल्या होत्या. जणूं मावशींचें काळीजच गोठून त्याचा दगड झाला होता. सोनीच्या हाताचें बोट त्या दगडाभोंवतीं वर्तुळें काढी, तेव्हां मावशींना बरें वाटे. त्या निर्जीव पाषणांतून मूर्तीची शक्यता सरसरूं लागे. ताणलेल्या वेदना वात्सल्याच्या झणत्कारानें हलत. मावशींच्या तोंडांतून दीर्घ निःश्वास सुटे. स्वप्नांतून चावळून उठल्यासारख्या त्या म्हणत,

" सोन्या, शहाणा आहेस तूं. "

कुत्रें रडल्यासारखी सोनी हसे. स्वतःचें मनगट चावून घेई.

मावशींना हालचाल करतां येईनाशी झाली. अन्न खातां येईनासें झालें. पाणी पितां येईनासें झालें. नुसत्या वेदना–वेदना. मावशी शुद्धि आणि बेशुद्धीच्या सीमेवर होत्या. कुठल्याच गात्रांत बळ उरलें नव्हतें. सर्वांगांत, मेंदूत, विचारांत वेदना भरल्या होत्या. मावशींचें दुखणें इतक्या विकोपाला गेलें कीं, घरच्या सर्वच मंडळींचा धीर सुटला. मिरजेचे डॉक्टर आणविले गेले. डॉक्टरांनीं मावशींना तपासलें. त्यांचे डोळे विस्फारित झालें. कुणाच्या तरी कानांत त्यांनीं अगदीं मोजक्या शब्दांत सांगितलें.

"It's too late. Cancer...तरी हरकत नाहीं. यांना ताबडतोब मिरजेला घेऊन चला. मी शक्य तों इलाज करीन...हा रोग सहसा... घेऊन या मिरजेला—"

झालें. मावशींना आपलें भवितव्य कळून चुकलें. मोठ्या पुतण्याला त्यांनीं बोलावून त्याच्या कानांत हलकेंच सांगितलें, " परवां जाऊं मिरजेला. "

मधला एक दिवस साऱ्यांनीं सोसला. लहानांपासून थोरांपर्यंत साऱ्यांचे चेहरे काळवंडले. मावशी मिरजेला जाणार होत्या त्या जणूं परत न येण्यासाठींच. गडबड-गोंगाट न करतां जणूं प्रत्येक जण त्यांना अखेरचा निरोप देत होता.

स्वतःच्या पायांवर उभें राहून एक पाऊल टाकण्याची शक्ति मावशींच्या पायांत उरली नव्हती. जीवनाच्या चारी अंगांचे तणावे जणूं तुटले होते. सारें शरीर किडीनें खाल्लेल्या लांकडासारखें हलकें, निर्जीव, विनाशयोग्य झालें होतें. पोटच्या पोराहूनहि अधिक प्रेमानें पाळलेल्या एकाहि मुलाचें नांव त्यांच्या ध्यानांत नव्हतें ! त्यांना एक आठवण होती— कपाळाच्या कुंकवाची. पण त्यांच्या किलकिल्या डोळ्यांना तात्या अद्याप उभे दिसत होते. त्यांचें प्रयाण अहेवपणें होतें. जीव मुरडून पहात होता एकाच दुर्दैवी जीवाकडे–सोनीकडे...

सोनी अजून शहाणी झाली नव्हती. आतां होण्याची शक्यता नव्हती. सोळावें वर्ष लागून गेलें होतें. ज्योतिष खोटें ठरलें होतें. बेशुद्ध अवस्थेंतहि मावशींना स्मरण होत होतें. वात्सल्याचा आनंद एकट्या सोनीनें त्यांना दिला होता. माजघराच्या अंधारांत कित्येकदां आपल्या स्तनाचें टोंक त्यांनीं सोनीच्या ओठीं दिलें होतें. आणि वेड्या सोनीनें तें चोखलें होतें. मावशींच्या हिशेबीं सोनी अजाण लेकरूं होतें––तान्हें बाळ होतें— आईचा जीव लेकरांत घोटाळत होता. या रोगांत आपण मेलों तर त्या तान्ह्या बाळाचें कसें होणार ? सोनीला घरांत कुणी बरें बघत नाहीं. आपल्या माघारीं सारे हाल करतील तिचे. कधींहि मोठें न होणारें तें तान्हें आपल्या माघारीं जगणार नाहीं. मरेल. हातपाय खुडून मरेल. सोनी रस्त्यारस्त्यांवरून नागडी उघडी धावेल. चटोर पोरें तिच्यामागें लागतील. पिसाळलेल्या कुत्र्यांना मारतात तसें दगडांनीं सोनीला मारतील. ठेंचून प्राण घेतील. नाल्याच्या कडेला ती विद्रूप अवस्थेंत प्राण सोडील...नको. माझ्या तान्ह्याचे असे धिंडवडे व्हायला नकोत...मरण कुणाला चुकलें आहे ? पण हें असलें मरण ! छे : छे : ! माझ्या बाळाला...नाहीं...नाहीं ...तसें मी होऊं देणार नाहीं...त्यापेक्षां स्वतःच...

मावशी जोरांत किंचाळल्या आणि अंथरुणावर ताडकन् उठून बसल्या. पुनः गप्प झाल्या. फाटोवेत इतके त्यांचे डोळे रुंद झाले. उशी-वरच्या उशीवर त्यांचें मस्तक तडफडलें. परत स्थिरावलें. त्यांनीं ओठ आणि डोळे गच्च मिटून घेतले.

मिरजेला जाण्यासाठीं म्हणून घरांतल्या माणसांनीं मावशींना उच-ललें. एखादें निर्जीव प्रेत उचलावें तसें उचललें. अडखळतच मावशींनीं सोनीला हांक मारली. सोनी जवळ आली. डोळे किलकिले करीत मावशी अडखळत म्हणाल्या,

“ सोन्या–तुझं—दूध... ”

नेहमींप्रमाणें गणपतीच्या कोनाड्यांत दुधाचा पेला ठेवला होता. नेहमींप्रमाणें त्याच्यावर छापडीं झांकली होती. सोनी दुधाकडे धांवली.

घरच्या साऱ्या मंडळींना आश्चर्य वाटलें. अशा अवस्थेंतहि मावशींना सोनीच्या मुकेची आठवण राहिली !

निश्चेष्ट अवस्थेंत मावशींना वाड्याबाहेर आणलें गेलें. मोटारींत ठेवलें गेलें. मावशी बेशुद्ध होत्या. संपूर्णतया बेशुद्ध होत्या.

मिरजेच्या हॉस्पिटलमध्यें मावशी शुद्धीवर आल्या. त्यांच्या ओठांच्या हालचालींतून पहिला शब्द उमटला,

" सोऽ नीऽ "

" सोनी चांगली आहे काकी. तुम्ही कांहीं काळजी करूं नका ! " जवळ उभा असलेला मावशींचा थोरला पुतण्या बोलला.

मावशींचे डोळे विस्फारित झाले. उशीवरल्या उशीवर मान कड-मडली. त्यांनीं डोळे गच्च मिटून घेतले. मिटल्या डोळयांच्या कोपऱ्यांतून पाझर लागले.

" खरंच चांगली आहे— सोनी सुधारतेय काकी. " पुनः तो पुतण्या बोलला.

मावशींनीं डोळे उघडले. त्यांच्या चेहऱ्यावर कसलें तरी हसूं उमटलें. अत्यंत जिव्हाळयाचें मेलेलें माणूस चितेवर उठून बसलें तर जसलें हसूं येईल तसलें तें हसूं होतें.

" खरंच ? "

" खरंच काकी. "

मावशी पुनः गप्प झाल्या. त्या कांहींहि बोलल्या नाहींत, किंवा कसलीहि हालचाल करणें त्यांना साधलें नाहीं. आपलें ऑपरेशन केलें गेलें आहे, तें यशस्वी झालें आहे, मरणाच्या दारांत पडलेलें आपलें पाऊल कुणी तरी मागें ओढून घेतलें आहे, आपण वांचणार आहोंत, परत आपल्या हातून कुटुंबाची सेवा घडणार आहे...या साऱ्या विचारांहून फार मोठा विचार त्यांच्या शिणलेल्या मेंदूंत गारवा निर्माण करीत होता—' सोनी आहे. ती मेली नाहीं. बालहत्त्या करायला देवाचे हातसुद्धां धजले नाहींत. काळाच्या तोंडीं दिलेले माणिक परत आपल्या तळहातावर चकाकतें आहे.

सोनी जिवंत आहे...' मावशींच्या मेंदूतील विचार एकदम थांबले. त्यांच्या डोळयांसमोर एक चमत्कारिक चित्र दिसूं लागलें.

" तो दुधाचा प्याला. त्यावर झांकलेली ती छापडी. सोनीनें प्याला उचलला. तोंडाला लावला...मावशींनीं तें चित्र मानेच्या एका जबरदस्त झटक्यानें पुसलें. त्यांची तगमग झाली. कानठळया बसतील एवढ्या मोठ्या आवाजांत त्यांना सोनीची किंकाळी ऐकूं आली! हजारों मजूर हजारों करवतींना एकदम धार लावताहेत; त्यांचा कर्णकर्कश आवाज मावशींच्या कानांत घुमला. असेल नसेल तेवढें बळ एकवटून त्या ओरडल्या,

" सोने ऽऽ..."

" डॉक्टर!" मावशींचा पुतण्या एकदम किंचाळला. डॉक्टर आले. नर्स आली. सारे धांवले. डॉक्टरनीं मावशींना उपचार चालू केले.

—कॅन्सरसारख्या विलक्षण रोगांतून मावशी वांचल्या होत्या. धीरे धीरे त्यांची तब्येत सुधारत होती. घरांतील झाडून सारीं माणसें आलटून पालटून मावशींच्या समाचाराला येत होतीं. माझी आई देखील मिरजेला जाऊन मावशींना भेटून आली. एकटी सोनीच काय ती मावशींना भेटायची राहिली होती. आणि मावशींचा जीव तिला भेटण्यासाठीं तळमळत होता. भेटायला येणाऱ्या प्रत्येकाला त्या विचारीत,

" माझी सोनी कशी आहे?"

" सुधारतेय् ती. तुमच्या लाडानंच वेड्यांसारखी करत होती ती. आतां घरांत तिचा कांहींहि त्रास नाहीं!" प्रत्येक जण सांगे.

" मग इकडे का आणीत नाहीं तिला?"

" डॉक्टरांनीं मुद्दाम सांगितलंय् सोनीची अन् मावशींची भेट घालूं नका!" भेटणारे खुलासा करीत.

मग मात्र मावशी गप्प बसत. नाइलाजानें गप्प बसत. त्यांचे डोळे डबडबत आणि रुद्ध डोळ्यानीं त्या म्हणत,

" संभाळा हं सोनीला मी येई तों."

मावशींच्या बोलण्याला प्रत्येक जण होकार देत होता. मावशी मनोमन देवाला धन्यवाद देत होत्या. हात जोडीत होत्या. स्वतःला म्हणत होत्या, " तुझ्याइतकी दया परमेश्वरानं कुणाहि मनुष्यप्राण्यावर कधीं केली नसेल ! "

वात्सल्याचा प्रत्यक्ष अनुभव मावशींना नव्हता. छातीला लुचणारं बाळ त्यांना कधींच लाभलें नव्हतें. आणि आतां तर ऑपरेशननें त्यांचा उजवा स्तनहि पार नाहींसा झाला होता. पण मावशींच्या उरांतील वात्सल्य उचंबळत होतें. उसळत होतें. सोनीला केव्हां छातीशीं धरीन असें त्यांना झालें होतें. वात्सल्याचें दूध त्यांच्या सर्वांगांतून सळसळत होतें. सर्वांगाच्या गाढ आलिंगनानें त्याचा वर्षाव सोनीवर करण्यासाठीं त्यांच्या शरीराचा कणन् कण अधीर झाला होता.

जिवावरच्या दुखण्यांतून जगून वांचून मावशी परत गांवीं आल्या. त्यांना पहाण्यासाठीं अर्धा अधिक गांव लोटला. मावशी आल्या. दारांत जमलेल्यांपैकीं कुणाशींहि बोलल्या नाहींत; इतकेंच काय कुणाकडे पाहून नुसत्या हसल्यादेखील नाहींत. हंबरणाऱ्या वासराकडे धांवणाऱ्या गाईसारख्या त्या दारांतून आंत धांवल्या. अंगण–पडवी–माजघर–स्वैंपाकघर–परसूं अंजिराचीं झाडें...

" सोन्या–सोन्या–सोन्या–सोन्याऽऽ–"

अंजिराच्या झाडाखालीं बसलेल्या जिजा महाराणीला मावशींनीं ओरडून विचारलें,

" सोनी कुठाय् ग जिजा ? "

जिजा ताडकन् उभी राहिली. दोनहि हात डोळ्यांवर आपटून घेऊन ती गहिंवरली,

" सोनी गेली ग माझी बाईऽऽ. तूं मिरजेला गेलीस त्या दिवशींच. राती पाय खुडून ग मेली——"

" जिजा ऽऽ" मावशींनीं धांवत जाऊन जिजाचे खांदे पकडले. तिला गद्‌गद् हलवत मावशी ओरडल्या,

" जिजा सोनी गेली नाहीं ! मीं तिला घालवलं ! तिला ठार मारलं. मीं ठार मारलं. दळभद्रे, तूंच कण्हेरीच्या मुळ्या त्या पहांटे आणून दिल्यास. लेकराच्या दुधांत मीं विष घातलं. मीं सोनीला मारलं. मीं सोनीला ठार केलं......"

मावशींना बोलवेना. ऊर पिटीत त्या खालीं कोसळल्या. पण धड-पडून उठल्या. पालथ्या हाताचें मनगट त्यांनीं कर–कर चावलें आणि कुत्रें रडल्यासारखा आवाज काढीत, तोंडावर हात घेत धांवत सुटल्या......



## मोती

४

'घे घे'

चांद महात पुनःपुन्हां आग्रह करीत होता पण मोती त्या अन्नाकडे ढूंकूनहि पहात नव्हता. मूळचेच बारीक असलेले आपले डोळे अधिक आकुंचित करून तो कसला तरी खोल विचार करीत होता. एक तास झाला, चांद त्याच्या नाकदुऱ्या काढीत होता. मोतीचा अभिमानी स्वभाव त्याच्या चांगला ओळखीचा होता. मोतीच काय पण त्याच्या गेल्या दोन पिढ्याही याच स्वभावाच्या होत्या हेंही चांद जाणत होता. म्हणूनच मोतीवर तो खेंसकला नाहीं, कीं त्यानें त्याला अंकुशाचें भय घातलें नाहीं.

बऱ्याच प्रयत्नानंतरही मोती रोटांना सोंड लावीत नाहीं हें ध्यानीं आल्यावर तो स्तब्ध झाला. रोटांची चवड मोतीच्या समोर ठेवूनच तो तेथून उठला व हत्तीखान्याशेजारच्या खोलींत गेला. आतां त्याची भाकरी खायची वेळ झाली होती. पण त्यानें भाकरीचें गांठोडें सोडलें नाहीं. मोती उपाशी आहे तर आपण कशाला खायचं? असा विचार करून तो खोलींतल्या मोतीच्या पाठीवर घालण्यासाठीं केलेल्या काथ्याच्या गादीवर कलंडला. मोती कां संतापला, यावांचून दुसरा कसलाही विचार डुलकी लागेतोंपर्यंत चांदच्या मनांत नव्हता.

चांद निघून गेल्यावर मोतीनें आपली सोंड सैलपणानें कमानीच्या या कडेपासून त्या कडेपर्यंत झुलविली व डोळे साफ मिटून तो तसाच

स्तब्ध उभा राहिला. आपल्यासाठीं अजूनही चांद उपाशी राहिला असेल, हें त्याच्या लक्षांत आलेंही एकदोनदां. पण त्या गोष्टीला महत्त्व देण्याइतकेंही आज त्याचें मस्तक स्थिर नव्हतें.

असें अपमानाचें जीवन किती दिवस कंठायचें ? हाच विचार त्यांच्या मनांत सारखा घोळत होता. परवां तर त्याच्या अपमानाची परमावधि झाली. खरोखरच मोतीसारख्या अभिमानी जीवाचा मानबिंदू धुळीला मिळावा असाच तो प्रसंग नव्हता का ?

मोती अस्सल अवलादींचा हत्ती होता. त्याच्या घराण्याला अत्यंत उज्वल असा इतिहास होता. आणि म्हणूनच बिनींच्या हत्तीचा मान आजच्या आमदानींतही त्याच्याकडे होता. संस्थानचा सरकारी लवाजमा जेव्हां जेव्हां निघे, तेव्हां चांदीचा हौदा आणि भगवी ध्वजा मोतीच्या पाठीवर असे. मानासाठीं मान देणारी जी अवलाद आजही जुन्या क्षात्रिय घराण्यांत सांपडते त्या जातीचा होता मोती.

मोतीची परंपराच तशी उज्वल ! चांद महाताच्या तोंडून त्यानें कैक वेळां ऐकलें होतें कीं रायगडावर थोरल्या शिवाजी महाराजांना राज्याभिषेक झाला तेव्हां जी पहिली भाग्यशाली मिरवणूक निघाली तिच्या बिनीवर मोतीचा मूळ पूर्वज होता. हिंदुपदपातशाहीची अमर कीर्तिध्वजा रायगडाच्या राज्यभूमीवर मिरवण्याचा मान त्या महाभाग गजराजाला मिळाला होता.

स्वामिभक्त आणि वंशाभिमान हे दोन गुण मोतीच्या रक्तांत भिनलेले होते. मोतीचे आजचे धनीही शिवरायांच्या एका सरदाराच्या पावन वंशांतलेच होतें. पण पोषाखासुद्धां त्यांच्या विचारसरणींत आतां फरक झाला होता. पण मोतीला मात्र आपली स्वामिनिष्ठा कधींही अनाठायीं वाटत नसे. उलटपक्षीं आपली पुढील पिढी रायगडावरच्या त्या राज्याभिषेकासारखा नवा राज्याभिषेक निश्चित पाहील अशी त्याला आशा वाटत असे.

गादीवरच्या राजपुरुषाला मुजरा करतांना, मोतीला त्या ठिकाणीं तो राजपुरुष न दिसतां पहिल्या छत्रपतीची जिरेटोपांतली वीरमूर्ति दिसत असे. पण परवांच्या गोष्टीपासून मात्र मोतीचें मन गादीवरच्या धन्याबद्दल विचालित झालें होतें. त्याला वाटत होतें, अजाणता कां होईना, पण सरकारांनीं आपल्या पिढीजात अभिमानाचा पाणउतारा केला!

त्याचें असें झालें, मुंबईकडची कोणी बोलपटसंस्था निसर्गचित्रांच्या चित्रणासाठीं तिथें आली होती. संस्थेच्या दिग्दर्शकांनीं महाराजांची भेट घेतली व एका दृश्यासाठीं महाराजांचा हत्ती भाड्यानें मागितला. बोलपटाच्या रुपेरी पडद्यावर, महाराज देणार असणाऱ्या मदतीच्या गौरवार्थ त्यांची छबी आभारप्रदर्शन, मुद्दाम दाखविण्यांत येणार असल्याचें अभिवचनही दिग्दर्शक महाशयांनीं दिलें होतें. पण म्हणून काय झालें? मोतीसारखा इमानी हत्ती त्यांनीं भाड्यानें द्यावा? निदान मोतीच्या मनाला तरी ही गोष्ट आवडली नव्हती. मोतीच्या मनांतले हेच विचार चांदच्याही मनांत आले होते. चांदनें ते खाजगी कारभाऱ्यांना बोलूनही दाखविलें होते. पण खाजगी कारभाऱ्यांनी चांदच्या म्हणण्याकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं.

नेहमींप्रमाणें मोतीला सजविण्यांत आलें व चांद त्याला चित्रणाच्या जागेवर घेऊनही गेला. आतांपर्यंत झालेल्या प्रकारानें मोतीचें डोकें आधींच तापलें होतें. तशांत आणखी एका कारणाची भर पडली. छत्रपति शिवरायांचा वेष केलेला एक नट उंच बुरुजावर उभा होता. मोतीनें त्याला मुजरा करावा, असें दिग्दर्शक महाशयांनीं चांद महाताला दिग्दर्शन केलें. मोतीच्या कानामागें पाय मारून चांदनें नाखुषीनेंच का होईना मोतीला तसा इशारा दिला. जन्मात पाहिल्यानें या वेळीच मोतीनें चांदची अवज्ञा केली. छप्पनदां इशारा केला तरी मोतीनें आपली सोंड रतिभरही उचलली नाहीं!

'त्याला उन्हाचा त्रास झाला असेल, पाणी दाखवून बघा!' अशी दिग्दर्शक महाशयांनीं सूचना केली म्हणून चांदनें मोतीला जवळच्या हौदाकडे वळाविलें. पण तरीही मोतीची सोंड स्तब्धच. हौदाकडून चांद मोतीला परत चित्रणाच्या जागीं हाकूं लागला. मोतीनें चारदोनदां 'चीं चीं'

असा आर्त आवाज केला.आणि जी धूम ठोकली ती,चांदच्या आरोळयांना, आज्ञांना व अंकुशालाही न जुमानतां, आपल्या तबेल्यापर्यंत. आपल्या नेहमींच्या तबेल्यांत आल्यावर मात्र तो शांत उभा राहिला. हत्ती पळून गेल्या-मुळें अर्थातच दुपारचें जेवण तेवढें नदीकांठीं उरकून बोलपट कंपनीचें पथक परतलें. बातमी महाराजापर्यंत पोंचली. महाराजांनीं चांदला बोलावून घेतलें व मोतीच्या या वागणुकीबद्दल खूप छेडलें.

चांद परत आला तो मोतीवर संतापून नाहीं, तर महाराजांच्यावर कातावून ! त्यानें महाराजांना सणसणीत जबाब दिला होता, 'माझं जनावर अस्सल आहे. त्याच्याकडून असलीं कामें महाराजांनीं करून घेऊं नयेत, आणि माझ्या पिढ्यान् पिढ्यांच्या सेवेचाही कांहीं मुलाहिजा धरावा !'

महाराजांच्या मातोश्रींनीं चांदची कड घेतली व, यावेळीं तरी या महाताला क्षमा करावी, असें महाराजांना सांगितलें.

परत आल्यावर चांदनें मोतीला खाऊं घालण्याचा प्रयत्न केला. पण तोही वाया गेला. मोती व चांद दोघेहि त्या दिवशीं असेच उपाशी राहिले.चित्रपटसंस्था महाराजांचे औपचारिक आभार मानून दुसरे दिवशींच दुसऱ्या एका संस्थानांत निघून गेली.

मात्र मोती व चांद दोघेही महाराजांच्या मनांतून उतरले.

खाजगी कारभाऱ्यांनीं महाराजांना सुचविलें, 'मोतीला आतां विकू-नच टाकावा !'

एका सर्कस मालकांत आणि संस्थानच्या खाजगी खात्यांत पत्र-व्यवहार सुरू झाला. पंधरा दिवसांनंतर चांदचा व त्याच्या मुलाचा संवाद मोतीच्या कानांत धगधगत्या ज्वालांसारखा येऊन भिडला.

'आतां आपलीं इनामंहि जप्त होतील उद्यां !'

'कां ?'

'मोतीचा सौदा पांच हजारावर कायम झाला !'

'असं जनावर शोधून मिळणार नाहीं पुन्हां !'

'सांगितलं खाजगी कारभाऱ्यांना !'

'मग ?'

'त्यांना काय त्याचं ? त्यांना वाटलं मी माझ्या इनामाच्या बचावासाठीं सांगतोंय !'

'काय म्हणाले ते ?'

'ते म्हणाले, तुमच्या नोकऱ्या रिसाल्याकडे बदलून घेऊं. नाहींपेक्षां तुम्हांला नवं जनावर आणून देऊं !'

'आपलं नशीब !'

'थोरले महाराज आज हयात असते तर असं झालं नसतं !'

मोतीच्या मस्तकांत जणूं अग्निकुंड पेटलें. चांद कमानींत आला व, एक अक्षरही न बोलतां, मोतीपुढें रोटांची चवड ठेवून गेला. मोतीला त्या रोटांची ठिकाणीं नोटांची चवड दिसत होती. तो मनांत म्हणत होता.

'ही किंमत केली महाराजांनीं माझी ! मला वाचा असती तर मीं ओरडून साऱ्या जगाला सांगितलं असतं कीं, या गादीला आतां स्वामिनिष्ठेची किंमत उरली नाहीं !'

चांद निघून गेला. मोती गेले तीन दिवस अक्षरशः उपाशी होता तरीही त्याची अन्नावर वासना होईना. तो मटकन् खालीं बसला. रवंथ करणाऱ्या बैलासारखे त्यानें डोळे मिटून घेतले. विचाराच्या अतिरेकानें त्याचें मस्तक उचलून, त्याचा मोठा स्फोट होईल कीं काय असें त्याला वाटत होतें. जवळजवळ पंधरा मिनिटें याच अवस्थेंत गेली. मोतीला कसली तरी गुंगी आली होती. वाड्यांतलें एक कुलुंगे कुत्रें मोतीपुढचें रोट बिचकत बिचकत कुरतडूं लागलें होतें. मोतीनें आपले डोळे किलकिले केलें न केलें तोंच त्याच्या दृष्टीला तें क्षुद्र जनावर पडलें. त्याचा संताप अनावर झाला. त्यानें आपल्या सोंडेनें त्याला खसकन् ओढून घेतलें व रागाच्या भरांत साखळदंडाच्या दगडावर त्याला असें सडकून आपटलें कीं त्याच्या मस्तकाच्या चिंध्या चिंध्या झाल्या. रक्ताचे तुषार, मोतीच्या सोंडेप्रमाणेंच कमानीच्या भिंतीवरही उडाले. कुत्र्यानें एक मर्मभेदक किंचाली मारली. वाड्यांतून शिपाई प्यादे धांवत आले. मोतीनें संतापाच्या

भरांत साखळदंडाला हिसडा मारला. साखळदंड तुटला नाहीं, पण साखळदंडाचा दगड मात्र मुळासकट उपटून आला. मोती पटांगणांत धांवत सुटला !

‘ मोती पिसाळला ! मोती पिसाळला ! त्यानें राणीसाहेबांचा कुत्रा ठार केला ! ’ जिकडेतिकडे भयंकर हलकल्लोळ उठला. धोतर सांवरीत सांवरीत खाजगी कारभारी खालीं आले व दबल्या आवाजानेंच त्यांनीं फर्मांविलें, ‘ त्याऽला गोऽळी घालाऽऽ ! ’ मोती सैराट धांवत सुटला. चांद व त्याचा मुलगा त्याच्या पाठोपाठ धांवत सुटले. मोतीनें वाटेंत मात्र कुणाला कसलीही इजा केली नाहीं. गांवाच्या बाहेर आल्यावर चांद त्या पळत्या हत्तीच्या समोर येऊन थांबला व ओरडला, ‘ मला आधीं तुडव आणि मग असा धिंगाणा घाल. साऱ्यांनीं नीति सोडली. तूं तर जनावर, तूं तरी कशाला किंमत धरतोस तुझ्या महाताची ! ’ आणि खरोखरच चांद त्याच्या वाटेवर आडवा पडला. मोतीचे डोळे जणूं कांहीं वितळत होते. तो स्तब्ध झाला. चांद उठला. एकाद्या अवखळ व हट्टी मुलाला आईनें कुरवाळावें तसें त्यानें मोतीच्या सोंडेला निर्भयपणानें कुरवाळलें. त्याच्याही डोळ्यांतून पाझर सुरू झाला होता.

‘ असं करूं नये बाबा. थोरांनीं चुका केल्या, ते थोर आहेत. आपण आपलं कर्तव्य करावं ! ’

चांदनें त्याच्या साखळदंडाचा लांबुडका दगड सोडून टाकला व ‘ चल ’ म्हणत तो साखळदंड धरून चालूं लागला. दोघांच्याही डोळ्यांतून पाण्याच्या धारा चालल्या होत्या.

गांवाबाहेर म्युझियमपाशीं साठमारीचें मैदान होतें. तें लोखंडी गजांनीं भरभक्कमपणें बंद करतां येत असे. चांद त्याला घेऊन आंत गेला. चांद आणि मोती साठमारी मैदानांत पोंचल्याची वार्ता हां हां म्हणतां नगरांत पसरली आणि सारा गांव पिसाळलेल्या हत्तीला पाहण्यासाठीं मैदानाकडे लोटला. खाजगी कारभारी बगींतून आले होते. तेथूनच ते ओरडले, ‘ चांद, त्याला चाप लाव ! तो पिसाळला आहे ! ’

'प्राण गेला तरी मी माझ्या जनावराला चाप लावणार नाहीं!' सर्व शक्ति एकवटून चांद ओरडला.

'तूं बाहेर हो म्हणजे आम्ही व्यवस्था करूं!'

कांहींही न बोलतां चांद बाहेर आला. मोती स्तब्धच उभा होता. चांद बाहेर आल्यावर चारदोन सशस्त्र शिपाई आंत उतरले व त्यांनीं भीत भीत मोतीला चाप लावले. मोती जागचा हाललाही नाहीं. त्याचें अंग बधिर झालें होतें. काय चाललें आहे हेंही त्याला कळत नव्हतें. ब्रॉंझच्या पुतळ्या-सारखा तो निश्चेष्ट होता. सशस्त्र सैनिक चाप लावून बाहेर आले. जागच्या जागीं त्यांना हावालदाऱ्या देण्याचें खाजगी कारभाऱ्यांनीं वचन दिलें. चांदची मात्र त्यांनीं वास्तपुस्तही केली नाहीं. हळुहळु गर्दी ओसरूं लागली. साठमारी मैदानाचें लोखंडी दार बंद करण्यांत आलें.

आपल्या पायांना चाप लागले आहेत हें आतां कुठें अस्पष्टसें का होईना, पण मोतीच्या लक्षांत आलें. क्रूसावरच्या ख्रिस्तासारखा तरीही तो धीरगंभीरच होता. पायाला लागलेल्या भयंकर कळा सोसूनही तो समोरच कुठें-तरी पाहात होता. आणि अगदीं समोरच म्युझियमची इमारत होती. इमार-तीची जी खिडकी उघडी होती त्या खिडकींतून समोरच्या स्टँडवर ठेवलेली हस्तिदंती ताजमहाल दिसत होता. मोती एकदम भानावर आला. पायाला खूप कळा लागल्या आहेत, पोटांत अन्न नाहीं, आपणाला हालतां सवरतांही येत नाहीं, वगैरे सर्व गोष्टी त्याच्या एकाएकीं ध्यानांत आल्या. ऊन रखरखत होतें. एकही बघ्या आतां मैदानाच्या अंवतीं भंवतीं दिसत नव्हता. मोतीचे डोळे त्या ताजमहालाच्या चिमुकल्या आकृतीवर खिळले होते. मोतीला माहित होतें कीं, तो ताजमहाल त्याच्या बापाच्या दांताचा होता. तशा जखडलेल्या अवस्थेंतही त्याच्या सुबुद्ध मेन्दूत विचार सुरू झाले. 'माझ्या वडिलांनीं आयुष्यभर सेवा केली आणि मेल्यावरही आपली स्वामिभक्ति अशा सुंदर स्वरूपांत चिरंजीव ठेवली. आणि मी?—मानवांच्या आहारीं जाऊन हें काय केलें?'

मोतीच्या मनांत हे पश्चात्तापाचे वारे वाहात आहेत तोंच चांद आला. मोतीच्या त्या दुर्दशेनें त्याला गेल्या चारपांच रात्रीं झोंप नव्हती.

चांदला पाहातांच मोतीनें आपली सोंड वर केली व आनंदप्रदर्शनासाठीं एक विशिष्ट आवाज केला. चांदनें ओळखलें, मोती शुद्धीवर आला. त्याला आतां मुक्त करावा! पण साठमारीच्या फाटकाच्या किल्ल्या आतां त्याच्या ताब्यांत कुठें होत्या ? किल्ल्या आणण्यासाठीं म्हणून तो वळला. चांद परततो आहे हें पाहून मोतीनें जास्त ओरडा सुरू केला. चांद ओरडून म्हणाला, 'थांब राजा, किल्ल्या आणतों!' मोती स्तब्ध झाला. मोठ्या प्रयासानें त्यानें किल्ल्या मिळविल्या आणि परत येऊन मोतीला मुक्त केलें. हा वेळपावेतों सरकसवाल्यांचा सौदा बारगळलाच होता. वेड्या हत्तीला घेऊन काय करणार तो बिचारा! चांदनें मोतीला पुन्हां तबेल्यांत नेलें.

हल्लीं मोतीला कसलेंच काम सांगण्यांत येत नव्हतें. म्हणून चांद त्याला रोज साठमारींत नेऊन खेळवीत असे. त्याच्याशीं लटकीच लढाई करीत असे. तिकडे जातां येतां रोज मोती म्युझियमच्या त्या खिडकीशीं थांबे, व आपल्या स्वामिभक्त बापाच्या स्मारकाचें दर्शन घेई. चांदही त्याला सांगत असे, हा ताजमहाल तुझ्या बापाच्या दातांचा आहे. तूं दिसण्यांत सहीन्‌सही त्याच्यासारखा आहेस. पण वागण्यांत मात्र थोडा तरण्या जनावरासारखा करतोस! एवढें म्हणून तो स्वतःशींच हंसे व मोतीच्या कानामागें पाय मारी. मोतीही गमतीदार चालीनें चालू लागे.

चांदची नौकरी आणि मोतीची चाकरी आतां पूर्ववत चालू झाली होती. एका पौर्णिमेच्या रात्रीं चांद व त्याचा मुलगा मोतीला धुण्यासाठीं तलावावर घेऊन आले. मुलगा पाणी शिंपडत होता व चांद मोतीचें अजस्त्र अंग मोठ्या ममतेनें घासून धूत होता. चंद्राचें किरण मोतीच्या शुभ्र दातांवर पडल्यामुळें ते चांदीच्या शिंगासारखे तळपत होते. मोतीला ते दिसत होते व, कां कुणास ठाऊक, त्याच्या मनांत आपल्या मरणाचे विचार येत होते.

हत्तीच्या दातांवरून चांदला ही आठवण झाली.

'उद्यां मोठा समारंभ आहे. मोतीला फिरवायचंय त्यांतून!

'कसला ?'

'साम्राज्यसरकारला जय मिळाला ना ?'

'बरं मग ?'

'त्याच्या आनंदासाठीं आपले महाराज रेसिडेंटसाहेबांचा सन्मान करणार आहेत आणि त्यांना भेट म्हणून शिल्या हत्तीच्या—'

शिल्या हत्तीचें–आपल्या बापाचें–नांव निघतांच मोतीही लक्ष्यपूर्वक ऐकूं लागला.

'शिल्या हत्तीच्या दांतांचा तो ताजमहाल साहेबाला बक्षीस देणार आहेत !'

'साहेबाला काय म्हणून ?' चांदच्या मुलानें विचारलेलाच प्रश्न मोतीच्याही मनांत आला आणि तलावांत उभा असतांही त्याच्या अंगाची लाही झाली !

'साहेब सरकारचा प्रतिनिधी म्हणून ? आणि तो ताजमहाल गांवांतून मिरवीत मिरवीत रेसिडेंटच्या बंगल्यावर न्यायचा आहे. आणि तें काम आमच्या मोतीकडे आहे !'

'हिरे लावले आहेत नाहीं त्या ताजमहालाला ?'

'लाख दीड लाखांचा जिन्नस आहे !' चांद म्हणाला. बोलत बोलत दोघेही मोतीला धूत होते. धुणें संपल्यावर हत्तीला चालवीत बापलेक बोलत निघाले. पण मोतीच्या मनांत मात्र 'माझ्या बापाची ही तेजस्वी आठवणही हे महाराज लोकांच्या स्वाधीन करणार ? यांना स्वतःच्या संपत्तीबद्दल आस्था नाहीं. इमानी हत्तीचे दांत यांना पृथ्वीमोलाचा ऐवज वाटला पाहिजे. ते कुणाला तरी तो स्वतःच्या लहरीसाठीं अर्पण करणार ! आणि तोंही कुणाला ? ज्याचा आमच्याशीं कांहीं संबंध नाहीं अशा एका गोऱ्या माणसाला ! माझ्या बापाच्या दांतांची ती वस्तू तो उद्यां आपल्या देशाला घेऊन जाईल. मग इथें त्याच्या सेवेचं स्मारक काय राहाणार ? यांच्याजवळ काय दुसऱ्या वस्तू नव्हत्या त्याला द्यायला? मोती झपाझप चालत होता. महातांचीं बोलणींहि चालू होतीं. मोती तसे

त्यांत आला. झोंपायला जातांना चांदनें मोतीला बजावलें, ‘ अंगावर गदळ घेऊं नकोस हं आतां ! आतां कसा छान रंग झालाय तुझा पावसाळयांतल्या ढगासारखा !’

चांद निघून गेला. मोतीला झोंप आली नाहीं. त्यानें चारा खाल्ला नाहीं. गवत अंगावर घेण्याचा नेहमींचा लाडका चाळाही केला नाहीं. त्यानें आपल्या मनाशींच कांहीं तरी निश्चय केला. त्याचे चुटकले डोळे केवढेतरी विस्फारित झाले होते त्यावेळीं. पहांटेच्या वेळेला मात्र चांदला कांहीं संशय येऊ नये म्हणून, त्यानें सारें गवत खाऊन टाकलें व झोंपल्याचें सोंग केलें. नेहमींप्रमाणें चांद आला. त्यानें पाहिलें. मोती झोंपला आहे. चारा उरलेला नाहीं. त्यानें त्याला उठवलें नाहीं. तो तसाच गुपचूप परत गेला. न्हाऊन झोपी गेलेल्या बाळाची झोंप त्याच्या आईला मोडवत नाहीं. तशीच कांहीं अवस्था झाली चांदची !

मोतीच्या सोंडेवर रंगीत खडूनें इंग्रजी ‘V’ ची आकृती काढण्यांत आली. जरी किनखापची झूल आणि चांदीच्या घुंगुरमाळांनीं त्याला सजविण्यांत आलें. हौद्यांत उंच गिरद्या रचून त्यावर शिल्या हत्तीच्या दातांचा तो ताजमहाल ठेवण्यांत आला. सारा रिसाला जमला. महाराज आले. राणीसाहेब आल्या. बँड वाजूं लागला. सशस्त्र सैन्यानें दोन रांगा केल्या. महाराजांची मोटारही रस्त्यावर आली. शिंग झालें व वाड्याच्या महादरवाज्यांतून मिरवणूक चालू झाली. नागरिकांचा प्रचंड मेळा जमला होता. सरदारदरकदार रांगेनें चालत होते. गच्च्यासज्जावरून नारीजन सोहळा पाहात होता.

रेसिडेंटचा बंगला नदीकांठीं होता. मिरवणूक त्या रोखानें चालत होती. नागरिकांच्या दृष्टीला ती एका वस्तूची मिरवणूक होती. पण मोतीच्या मनाला मात्र ती आपल्या बापाच्या स्वामिभक्तीची निर्दय प्रेतयात्रा वाटत होती ! तो धिमेपणानें पावलें टाकीत होता. अशीच मिरवणूक नदीच्या तीरापर्यंत आली. आतां बंगला दिसूं लागला होता. बंगला दृष्टीस पडतांच धाडधाड असे दहातीस बार काढण्यांत आले. मोती तिथेंच थबकला ! कांहीं केल्या हलेना. मागच्या मोटारी मागेंच

थांबल्या. व पुढच्या रांगा मागें तोंड वळवून पाहूं लागल्या. चांदला काय करावें तें समजेना. मोतीला समजूत घालावी म्हणून तो खालीं उतरला. त्याबरोबर मोती स्वैर धांवत सुटला. गर्दीची पांगापाग झाली.

'मोती पुन्हां पिसाळला !' ओरडा झाला. कल्लोळ उठला. शिस्तीचे सैनिक वाट फुटेल तिकडे धांवूं लागले. सरदारांनीं उलटीं तोंडें वळवून धांवण्यास प्रारंभ केला. मोटारी दूर अंतरावर गेल्या. हत्तीच्या पायाखालीं एकदोन माणसें चेंगरलीं गेलीं. आरडाओरडा आणि धुमाकूळ माजला.

'त्याला गोळी घाला !' महाराज स्वतः ओरडले.

शेपन्नास बंदुकवाले मोतीमागें धांवले. धाड् धाड् धाड् धाड् ! बारापाठीमागें बार झाले. मोतीचा विस्तीर्ण देह एखाद्या बुरजासारखा कोसळला.

तो मेला याची खात्री झाल्यावर बघ्यांची गर्दी झाली. मोती मेला ! त्याच्या देहाची चाळण झाली होती.

वेडा मोती मेला !

पण आश्चर्याची गोष्ट ही कीं मरतां मरतां त्यानें तो ताजमहाल मात्र नदींत फेंकला होता !

वेडा मोती मेला !

त्याच्या बापाच्या दांताचा ताजमहाल मात्र त्यानें आपल्या मरणापूर्वी अथांग जलदेवीच्या हवालीं केला !

दुसरे दिवशीं खाजगी कारभाऱ्यांनीं चांदची चौकशी केली.

त्याचा कुठेंच पत्ता लागला नाहीं !

• • •

# मुकें प्रेम



दिवसाचा देव अगदीं माथ्यावर आला होता, कृष्णेच्या विस्तीर्ण पात्रांतील वाळू तापून रणरण करीत होती. गांवाकडील बाजूच्या गुडघाभर धारेला देखील कढ आला असावा. वाळवंटांतल्या क्षिरगोळयाप्रमाणेंच पाण्याचा पृष्ठभागही चम्चम् चमकत होता. पानोथ्यावर आतां चिटपांखरू देखील नव्हतें. नाहीं म्हणायला गांवचा परीट आणि त्याची दाणगट बायको, खालीं लांब परीटधुण्यावर एक पासोडी झोडपत होती. त्याचा आवाज डगरीपर्यंत येत होता. पलिकडच्या मळईत शेवरीचीं हिरवीं झाडें स्तब्ध उभीं राहून नाइलाजानें उन्हांत तापत होतीं. हलतां येत असतें तर तीं देखील तेथून उठून गांवांतल्या 'म्हाताऱ्या वडा' च्या गार सावलींत येऊन कलंडलीं असतीं.

पानोथ्याची उतरण सुरू होते तिथें तो विशाल वड किती वर्षें उभा होता कोण जाणे ! गांवांतल्या वृद्धांत वृद्ध असणाऱ्या एकशें पांच वर्षांच्या म्हातारीनें देखील तो वड तसाच 'म्हातारा' पाहिला होता. त्याच वडाच्या छायेंत तिनें नागपंचमीचीं गाणीं गायिलीं होतीं. तीही सांगत असे कीं "माझ्या वेळचीं म्हातारीं माणसें देखील या वडाला 'म्हातारावड' च म्हणत !

आतां सुद्धां पारंब्यांच्या उपवृक्षांनीं विस्तृत झालेल्या त्या वडाच्या गार छायेंत कैक बेवारशीं कुत्रीं माना छातींत खुपसून पेंगत होतीं. गांवदेवीला

सोडलेला घुळी कान झडपीत रवथ करीत होता. कुंभाराचीं ' गाढवें ' शहाण्यासारखीं गप्प बसून राहिलीं होतीं. त्या वडाची छाया म्हणजे जणुं एक विश्रांतिस्थानच झालें होतें. गांवातले सर्व बेवारशी मुके प्राणी त्या वैशाखी उन्हांत—तिथें विश्रांतिसुखाचा लाभ घेत होते. पण गांवाबाहेरचाहि एक बेवारशी मुका प्राणी त्याच वडाच्या छायेंत आपल्या कामांत गुंतलेला होता. त्या मुक्या प्राण्याचें नांव रोहिदास चांभार.

त्या वडाच्या एका पारंबीचीच पाठभिंत करून रोहिदासाचें खोपट उभें होतें. त्याला मायेचें असें या उभ्या जगांत कुणीही नव्हतें. गांवातल्या उच्चवर्णीयांचे जोडे शिवायचे आणि त्याच्या उपकारांच्या ओझ्याखालींच गांवाबाहेर कसें तरी जगायचें, हें त्याचें जीवन.

उन्हातान्हांत केव्हांही रोहिदास आपल्या कामांत गढलेला असायचा. आतां तर वैशाखाचा महिना. गांवांतल्या कित्येक कुमारिका सौभाग्यवती होऊन परघरीं जाण्याचा मंगल मास हा! वरातीसाठीं लागणारे वधूवरांचे कोंवळे लाल जोडे शिवण्याचें काम रोहिदासापुढें ढिगानें पडलें होतें. न कंटाळतां तो आपल्या कामांत रंगला होता. आजूबाजूच्या वातावरणाइतकेंच त्याचें काम निःशब्दपणें चाललें होतें. काम करतांना विरंगुळयासाठीं श्रमी लोक देखील गातात म्हणे; रोहिदासाला ती देखील शक्यता नव्हती. बारा वर्षांपूर्वी आलेल्या एका आजारांत बिचाऱ्याचें तोंड गेलें होते.

बालवयांतच त्याचे आईबाप विठ्ठलचरणीं गेले होते. गांवच्या ओझ्यांत पडलेलें तें बेवारशी पोर गांवच्या उष्ट्याखरकाट्यावरच लहानाचें मोठें होऊन गांवच्या सेवेला लागलें होतें.

हलक्या जातींच्या पोरांना अक्कल असूं नये हें खरें. पण रोहिदास लहानपणीं मोठा हुशार होता. शाळेंतल्या आण्णा मास्तरांनीं त्याला कैकदां शिवून शाबासकी दिली होती. त्यावेळीं ब्राह्मणांच्या पोरांपेक्षांही तो धडाधड उदाहरणें सोडवी. व मोरोपंतांच्या अवघड आर्या तोंडपाठ म्हणे. आण्णा मास्तर म्हणत, "नांवाप्रमाणें आधुनिक रोहिदास होईल बेटा !"

मराठी चवथीच्या परीक्षेंत रोहिदासाचा पहिला नंबर आला. सरकारांतून मास्तरांनीं त्याला महिना दोन रुपयांचीं देणगी दिली. पण गरिबाला असें कांहीं लाभूं देण्याइतकें दैव काय दुधखुळें आहे ? पांचवीच्या परीक्षेच्या वेळीं गांवांत गांठीतापाची सांथ आली आणि गांवाआधीं बिचाऱ्या रोहिदासालाच ताप आला आणि कांखमांजरी उठली. अस्पृश्याचें, त्यांतून बेवारशी पोर. कोण करणार त्याला उपचार ? आण्णामास्तरांनीं खूप कष्ट घेतले. पदरचे पैसे खर्चून डॉक्टर आणला. एकनाथाच्या भूतदयेनें आपल्या आजारी शिष्याची शुश्रूषा केली. रोहिदास वांचला पण त्याची वाचा मात्र कायमची गेली.

वाचा गेली तरी कान शाबूत होते. रोहिदास शाळेंत जाई. पण आतां त्याला मोरोपंताच्या आर्या धडाधड म्हणतां येत नसत. पुढें आण्णामास्तरही बदलून गेले. आणि रोहिदासाची शाळा सुटली. शेजारच्या गांवीं एका चांभाराकडे राहून तो आपला धंदा शिकला आणि गांवकीचें काम करूं लागला. गेलीं दहा वर्षे तो या वडाखालच्या खोपटांत राहात होता भाकर मागायला सकाळीं आणि पोथी ऐकायला संध्याकाळीं एवढाच काय तो गांवांत जाई. एरव्हीं सारा वेळ कसलीं तरी कातडीं वापी आणि त्यांना टाके घाली. त्याला कसलेंही व्यसन नव्हतें. एखाद्या वेळीं फारच मोकळा वेळ मिळला तर तो गांवांतलीं शिळीं वर्तमानपत्रें आणी आणि तीं मन लावून वाचीत बसे.

आजही लाल जोड्यांचा एक जोड तयार करून त्यानें बाजूला ठेवला न ठेवला, तोंच पाठीमागून नित्य परिचयाचा गोड कलकलाट त्याच्या कानीं आला. गांवांतल्या मुलींचा घोळका हंसत खिदळत पानोध्याकडे येत होता. त्या मुली वडाखालीं येतांच कसल्या तरी लाजेनें रोहिदासानें मान खालीं घातली आणि समोरच्या कातड्यांची चाळवाचाळव केली.

“ राधे बघ कीं ग तुझा कान्हा ! ” एक छिटुकली रोहिदासाकडे अंगुलीनिर्देश करून म्हणाली. रोहिदासाला राहवलें नाहीं, त्यानें मान वर केली. सखींच्या मेळाव्यांत उभ्या असलेल्या शकुंतलेचें चित्र त्यानें पाहिलें होतें. त्याला वाटलें तेंच सजीव होऊन आपल्यासमोर उभें आहे.

" अग बाई, बघतोय् ! " त्या छिटुल्लीनें राधेचे खांदे गदागदा हलविले. पुन्हां चिमण्यांचा कलकलाट झाला. आतां मात्र रोहिदासानें मान खालीं घातली नाहीं. त्या मुली राधेला चिडवीत होत्या. ती लाजेनें चूर होऊन निसटण्याच्या बेतांत होती. त्या तिला सोडीत नव्हत्या. रोहिदासाचे डोळे आनंदानें भारावले होते. मुलींच्या थट्टा चालल्याच होत्या " अग भेट जा तरी नवऱ्याला ! "

' नवरा ? ' मुका रोहिदास आपल्या मनाशीं बोलूं लागला. "हिचा नवरा होण्याचं भाग्य मला पामराला कुठलें ? ती मराठा, मी चांभार ! ती कुबेर मी सुदामा. ती लावण्यसुंदरी मी वेडाविद्रा. छे, मुलींनो, कां घाव घालतां माझ्या हृदयावर ? दानव वासुकीचा जांवई होईल तरी कसा ? तिचा साळुंकीचा गोड साद आणि मी तर—"

"नका गडे थट्टा करूं, आतां का लहान आहे मी ? " तो साळुंकीचा साद, तीक्ष्ण अरी चामड्यांत घुसावी, तसा त्याच्या उरांत घुसला. मुलींचा घोळका पाठमोरा होऊन पायथ्याचा डगर उतरीत होता. खरंच, राधा आज किती मोठी दिसत होती ! गेलीं पांच वर्षें मुली राधा–रोहिदासाची अशीच थट्टा करीत होत्या. पण आजच्याइतका रोहिदास कधींच बेचैन झाला नाहीं. मुली नदींत जाऊन पोंचल्यादेखील. रोहिदासाचें आतां कामांत लक्ष लागेना. " ते लाल जोडे पायांत घालून आपण आणि राधा......... " त्याच्या मनांत अशक्य, असंभाव्य असें कांहींच्या-बाहींच येऊं लागलें. सांवलीखालीं बसलेलें एक गाढव उगीचच्या-उगीचच मोठ्यानें खेंकाळलें. रोहिदासाच्या लक्षांत स्वतःचा मूर्खपणा आल्यावांचून राहिला नाहीं. गाढवाचें खेंकाळणें आंकसत आंकसत विराम पावलें. नदीच्या पात्रांतून मुलींच्या हंसण्याचा एक उंच नाद उसळला. रोहिदासाचे डोळे पाण्यानें डबडबले. कृष्णेच्या गरम पाण्यांत मुली मनमुराद डुंबत होत्या, डुबक्या मारीत होत्या, पाणी उसळीत होत्या. पाठशिवणी खेळतां खेळतां एकमेकींना बुडवीत होत्या. त्या बालिश जलक्रीडेंत राधेच्या कमरेची नाडी सैल झाली म्हणून भिजल्या चिरडीचा घोळ हातीं धरून ती तापल्या वाळूंत आली. तोंड

वळवून चिरडीची नाडी आवळूं लागली. बारा तेरा वर्षांचें तें उमदें मुसमुशीत तारुण्य ओल्या वस्त्रांत अधिकच सुंदर दिसत होतें. केंसांतून मोती गळत आहेत. भिजल्या गालावरून जणुं डाळिंबाचा रस ओघळतो आहे. ओठांतलें तोंडलें फुटून वाहायला लागलें आहे. डोळ्यांत तारुण्याची धुंदी आणि गळत्या वस्त्राची जाणती लाज. रोहिदासाला वाटलें, " अगदीं विळख्यांत घ्यावं तिला ! " नाडी बांधून होतांच राधेची नजर सहज वर गेली तों दगडीवर रोहिदास ! ती लाजून हंसल्याचा रोहिदासाला स्पष्ट भास झाला. ती आणि तो एकदमच वळले. धामणीसारखी राधा पटकन् पाण्यांत शिरली व मुलींच्या घोळक्यांत मिसळून गेली.

वडाखालीं खोपटाशीं येऊन पोंहोंचेपर्यंत रोहिदासाला धांप लागल्यासारखें झालें. आपण गुन्हा केला असेंच त्याचें पापभीरू मन त्याला सांगत होतें. ज़खमी झाल्यासारखा तो वडाखालच्या जमिनीवर बसला. त्याला वाटलें एकदम जाऊन पाण्यांत अंग टाकावें. कशानं तरी त्याच्या अवघ्या शरीराचा दाह होत होता. तो थोडा वेळ तसाच बसला...... गोपींचें वस्त्रहरण......राधाकृष्ण......रासलीला......छे......भलतें सलतें कांहीं त्याच्या डोक्यांत गरगरूं लागलें. तो अत्यंत अस्वस्थ झाला. तोहि मनुष्यप्राणीच होता. प्राण्याची भावना त्यांच्यातही होतीच. गेलीं पांच वर्षें राधा परकरी पोर होती तेव्हांपासून पानोथ्याच्या मुली त्याचा आणि राधेचा विवाह जुळवीत होत्या. आज त्याच्याही मनाला तसें वाटलें तर त्यांत त्याचा गुन्हा काय ? होय. त्याची ऐन पंचवीशी नुकतीच उलटली होती, तो तिशींच्या घरांत होता. ती ऐन बारातेरांत. तो चांभार ती थोरामोठ्या कुळांतली. तो राकट, ती गुलछडी. तो मुका, अनाथ, पतित–आणखीन् कांहीं... ! सगळें खरें, पण सौंदर्यावर मोहून जाणें हा माणसाचा धर्म आहे. त्याचें मन का याला अपवाद असेल ? मनावर ताबा राहिला नाहीं आणि त्यानें राधेला ओल्या वस्त्रांत न्याहाळली. साहजिकच नव्हतें कां तें ?

रोहिदासाला मात्र तसें वाटत नव्हतें. त्याला वाटत होतें आपण पायरी सोडली. चोख्यामेळ्याचा दगडसुद्धां पांडुरंगाची पायरी चढून

वर गेलेला नाहीं. मीं काय केलें हें ? तिनें ही गोष्ट आपल्या वडिलांना सांगितली तर ?— सारा गांव चेंचून जीव घेईल माझा...... ! आणखी किती वेळ तरी तो तसाच विचार करीत राहिला असता.

" अरं मुक्या, शिवलंस न्हाई ते जोडं ? " कुणी तरी त्याला हुकूमी आवाजांत विचारलं. तो चटकन् उठला आणि आपल्या जागेवर गेला. तयार केलेलें जोडे त्यानें आपल्या अंगरख्यानें पुसले आणि मागणाऱ्याच्या स्वाधीन केलें.

" सांजचं तांब्यापितळी घेऊन ये लगीन वराकडं ! " जातां जातां खूष झालेला गांवकरी त्याला अवतणें देऊन गेला. रोहिदासानें मान डोलावली खरी पण त्याचं मन उसळून म्हणालं, " तर, तर, दुसऱ्यांचींच लग्नं जेवतों मी. दुसऱ्याच्याच वरातीचे जोडे शिवतों. माझ्या प्रेमाचा विचार कुणी करतंय् कां ? " रोहिदास स्वतःवर विलक्षण चिडून गेला. उन्हें खाली होईपर्यंत त्याच्या अंगाचा नुसता दाह चालला होता. तासा दीड तासानेंच मुलींचा घोळका दरडीवरून वर आला. मात्र आतां राधेला कुणी चिडविलें नाहीं. वडाखालून साऱ्या गुपचूप निघून गेल्या. रोहिदासाचे डोळे अगदीं नकळत वर झाले. राधा त्याच्याकडेच पाहात होती. त्याला पाहातांच राधेनें खालचा ओठ वरच्या दातांनी दाबला आणि चटकन् नजर खालीं वळवून तीं पुढें चालूं लागली. रोहिदास मनांत चांगलाच चरकला. त्याला आतां पुरतं कळून चुकलें कीं राधेनें ' ती ' गोष्ट आपल्या मैत्रिणींना सांगितली. आतां ही बातमी गांवांत झाली तर ...? उन्हं खालीं झाल्यावर राधेचे वडील दाजीसाहेब जेव्हां वडाखालीं आले, तेव्हां तर रोहिदास पुरतांच हबकला. थरथरत्य हातानेंच त्यानें त्यांना मुजरा केला. नेहमींप्रमाणें त्यांनीं त्याच्या मुजऱ्यांचा हंसत स्वीकार केला तेव्हां त्याचा जीव कुडींत पडला.

संध्याकाळीं तो पोथीला गेला नाहीं. आपली धुरकट चिमणी पेटवून घरांतच ' नामदेवाचें लग्न ' वाचीत बसला. उभ्या खोपटांत हेंच पुस्तक त्याच्या हातीं लागावें याचें त्याला नवल वाटलें. नऊ वाजण्याच्या

सुमाराला तो लगीनघरांतून वाढप घेऊन आला. वऱ्हाडणी मिरवतांना तिथंही त्याला राधा दिसली. अपराधी नजरेनें त्यानें तिच्याकडे पाहिलं गॅसच्या प्रखर प्रकाशांत तिचे डोळे त्याला संतापल्यागत दिसले. त्याचें काळीज पुन्हां चरकलें. लगीनघरांतील वाढप तसंच राहिलें.

खोपटाच्या दारांत रकाब्यावर पडल्या पडल्या तो सारी रात्र तळमळत होता. वरातीचा तडतडाट, गाढवांचें ओरडणें, गांवांतल्या पोरांचें केंकाटणें, कोंबड्याची रांग, अंबाकाकूंनीं कृष्णेला जातांना गाइलेली भूपाळी आणि वडावरच्या पांखरांचा गलगा—अंतराअंतरानें त्यानें जागेपणींच ऐकला.

बाभळीच्या दांतवणानें दांत घांशीत स्नानाला निघालेल्या दाजी-साहेबांनीं त्याचा मुजरा कालच्यासारखा हंसतच आज सकाळींही स्वीकारला रोहिदासाला इतका तरी धीर आला कीं—कालची गोष्ट थोरापर्यंत नक्की गेली नाहीं. तो नेहमींप्रमाणें आपल्या कामाला लागला.

आजही दुपारीं मुलींचा घोळका त्याच्या अंगावरून गेला. त्याची छाती धडधडत होती. त्यानें वर पाहिलें नाहीं. मुलींनींही राधेची थट्टा केली नाहीं. पांच वर्षांचा नेम आज चुकला. आपल्या मूर्खपणानें आपण एका गोड सुखाला आंचवलों असें रोहिदासाला वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

ज्येष्ठांत आणखी कांहीं वरातींचे जोडे त्यानें शिवले. आखाडांत पाऊस शिम् शिम् करून गांव भिजवून गेला. म्हाताऱ्या वडानें त्याचें खोपट भिजूं दिलें नाहीं. नागपंचमीला मुलींनीं झोपाळे बांधले, झोके काढले, गाणीं म्हटलीं. राधाही त्यांत होती. भीत भीत त्यानें तिच्याकडे पाहिलें, तिनें मान देखील वळविली नाहीं. तिच्या मैत्रिणींनींही रोहिदासावरनं तिची थट्टा केली नाहीं. भादव्यांत गौरी. डोळा वर न करतांच रोहिदासानें राधेचा साद ऐकला.

आंकडी तापलं दूध, दुधाला पिवळी साई
येग गवराबाई, एवढं जेऊनि जाई !
आतां काय करूं बाई शंकर आला
जोडवीं ल्यायला उशीर झाला !

मुली तिच्या पाठीमागें म्हणत होत्या, पण कुणीही रोहिदासावरनं तिची थट्टा केली नाहीं. दिवाळी आली. गांवांत दिवे लागले. दाजीसाहेबांच्या घरांतला सण मागायला रोहिदास रीतीप्रमाणें गेला. वैशाखांत ओल्या चिरडीची नाडी बांधणारे गोरे हातच त्याच्या ओव्यांत कानवले कडबोळीं ओतत होते. वर बघायचं धाडस त्याला झालें नाहीं. राधेनेंही त्याला कांहीं विचारलें नाहीं. शरदाचें चांदणें टिप्पूर पडूं लागलें. वडाच्या पानांतून तारा मोजीत रोहिदासाला झोंप लागूं लागली. त्या दिवशीं तो असाच तारा मोजीत होता. सहा महिने तरी होऊन गेले, राधा त्याच्यावर जणुं रागावली होती. त्या दिवशींच्या मूर्खपणाचा त्याला आतां पुरा पश्चात्ताप झाला होता. बोलतां येत असतें तर राधेची क्षमा मागून आपण उरांतली जखम तरी काढून टाकली असती, असे विचार त्याच्या मस्तकांत घोळत होते. रात्र बरीच झाली हें चांदण्यावरून ध्यानीं आल्यावर त्यानें तोंडावर कांबळें ओढलें; तोंच ' रोहिदास ' अशा गोड हांकेनें तो जागा झाला. त्याचा त्याच्या कानांवर विश्वास बसेना. तो आवाज राधेचा होता. तो ताडकन् उठला. चांदण्यातल्या सांवलींत राधा—राधाच उभी होती. ती गालांतल्या गालांत हंसत होती. पांढऱ्या शुभ्र साडींत ती चांदरातीसारखी दिसत होती.

" इतक्या रात्रीं आलें म्हणून घाबरूं नकोस. चांदणं बघ कसं छान पडलंय्. चल आपण डगरीवर बसूं—माझ्या चाहटळ मैत्रिणी कुणी नाहींत बरोबर. "

मंत्रानें भारल्यासारखा रोहिदास तिच्या पाठोपाठ निघाला.

" हातांत हात दे माझ्या ! "

कातड्यांतून काम करणारे राकट हात जणूं फुलांत विसावले. कृष्णेचा शांत प्रवाह चांदण्यानें चांदीचा झाला होता. मळईतल्या शेवऱ्यादेखील चंदेरी शालू नेसून उभ्या असल्यासारख्या दिसत होत्या.

तीं दोघेंही डगरीवरच्या खडकावर बसलीं. त्या काळ्या खडकावर देखील चांदीचा वर्ख पसरल्यासारखा दिसत होता.

" बैस, रोहिदास अगदीं शेजारीं बैस. प्रेमाच्या राज्यांत चांभार मराठा हा भेद नाहीं. साडेपांच वर्षं तुझ्या माझ्या डोळ्यांनीं आपलीं मनं गुंफलींत. आतां शरीरं कां दूर ? "

रोहिदासाला हटकून वेड लागायची पाळी आली. त्याला एकाएकीं बोलतां येऊं लागलें—

" राधा, राधा, राधा, राधा, " त्यानें कितीदां तरी हांका मारून पाहिल्या.

" बोल रोहिदास ! "

" राधा, तुझ्या हाताला हात लागतांच मला वाचा आली. तुझे हात देवाचे आहेत. " रोहिदास गहिंवरून बोलला.

राधेनें कांहींच उत्तर दिलें नाहीं.

" बोल कीं ग राधा ! "

" तूं बोल, मी ऐकतें ! "

" सहा महिने तूं रागावलीस. मला किती वाईट वाटलं ! त्या दिवशीं नदींत मी तुला ' तशी ' पाहिली. मी तरी काय करूं राधा ? मला राहवलं नाहीं. तुझ्या रूपानं मला वेड लावलं. प्राण गेला तरी पतंग दिव्यावर झडप घालतो, राधा ! राधा, तूं आज अशी येशील असं मला वाटलं नव्हतं. राधा, ज्ञानेश्वर महाराजासारखं मला ज्ञान असतं तर मी तुझ्या गुणांवर ग्रंथ लिहिले असते. तूं सारखी अश्शी माझ्याजवळ राहा. दाजी पाटील आपल्या आड येतील, गांवकरी आड येतील, आपण इथं राहूंया नको ! या चांदण्या रात्रीं असंच जाऊं या. तुला मला कोणी ओळखणार नाहीं तिथं जाऊंया. कसलं का असेना, माझ्या हातांत कसब आहे. धंदा कोणताही झाला तरी तो चांगला. मी शहरीं पायताणं शिवीन. खूप पैसे कमवीन. माझ्या राणीला सोन्यानं मढवीन—जरीचं पायताण घालून मिरवशील—चल राधा, जाऊंया आपण पळून ! " जणूं जन्माच्या मुकेपणाचें पारणें फेडून घेत होता रोहिदास. राधा त्याच्या गालाला गाल लावून ऐकत होती.

" तूं बोल ना राधे ! "

आतां कांहीं बोलायची नाहीं मी. तूं बोलका झालास, मी मुकी झालें ! "

" थट्टा करतेस गरीबाची ? "

" तुला कोण गरीब म्हणेल राजा, माझ्या मनाचा श्रीमंत धनी तूं!"

" किती गोड बोलतेस राधा ! तुझ्या तोंडांत मध आहे का ? "

" बघ-ना ! " राधेनें आपले ओंठ लाडानें त्याच्या ओठाजवळ आणले.

रोहिदास एकदम दूर सरकला, त्याचें अंग शहारलें—

" नको, नको, अजून आपण आपल्या गांवांत आहोंत. लग्न झालं नाहीं आपलं ! " रोहिदास दूर झाला.

" चल, भित्रा कुठला ! " तिनें त्याचे खांदे धरले आणि...तो जागा झाला. डोळे फाडून त्यानें अंवतीं भंवतीं पाहिलं. चांदणं पुसट होत चाललं होतं. त्याच्या रकट्याशेजारीं पडलेलें कुत्रें उगीचच्या उगीचच शेपटी चावीत गुरगुरत होतें. त्याला त्या कुत्र्याचा संताप आला...तो त्याच्यावर एकदम खेंकसला"अऽऽअऽआईऽऽअऽ" हाय, तो पूर्वीसारखा मुकाच होता. तो रकट्यावर उठून बसला. काय करावें तें त्याला कळेना. तो स्फुंदूत स्फुंदून रडूं लागला.

स्वप्नानें देखील त्या बिचाऱ्याची अशी निष्ठुर थट्टा करावी का ?

सकाळीं कामाला बसला तरी त्याच्या डोळ्याचें पाणी खळलें नव्हतें. एका जोड्याचे टाके तोडून त्यानें मोकळे केले व पाण्याच्या कुंडांत टाकले. डोळ्यांत पाणी तरळत होतेंच, इतक्यांत--

" रोहिदास ऽऽ ! " दाजी पाटलाचा आवाज.

रोहिदासानें वर पाहिलें, दाजी पाटलांच्या मागें 'राधा' होती. आज ती कालच्यापेक्षांही मोहक दिसत होती.

पण कालच्यासारखें हेंही स्वप्न नसेल ना ? रोहिदासानें आपल्या

पायाच्या आंगठ्यावर अरी टोंचून पाहिली. कळ निघाली. तो जागा होता. मुजरा करून तो पटकन् उभा राहिला.

" अ, अ, अ, अ, अ, ? " म्हणजे " काय सरकार ? " त्यानें विचारलें.

"आमच्या राधाच्या पायाचं माप घे जरा...अरे खुळया, वरातीच्या जोड्याचं. दोन दिवसावर आलाय मुहूर्त ! "

रोहिदासानें हंसण्याचा प्रयत्न केला पण त्याला हंसता आलें नाहीं. त्यानें शेजारच्या वर्तमानपत्राचा कपटा जमिनीवर ठेवून सारखा केला.

" पाय ठेव राधा त्याच्यावर ! " दाजी पाटील बोलले. राधेनें पुढें होऊन पाय ठेवला. वर न बघतां रोहिदासानें तिच्या पायाभोंवतीं शिसपेन्सीलीची रेघ मारली. त्याच्या अंगाला तिच्या अंगाचा तोच पहिला आणि शेवटचा स्पर्श ! पाय बाजूला घेतांना राधेच्या पायावर एकच अश्रू ओघळला. मुक्या प्रेमाची अखेरची पूजाच ती. नाहीं तर काय ?



## सद्या हेकणे*

६

माथ्यावर आभाळ जळत होतें. वैशाखी दुपार जणूं साऱ्या जगावर आग पाखडत होती. अिनामदारांच्या परसांतील आळवांचा खड्डा देखील सुकून घट्ट झाला होता. कर्दळी-दुपारींचीं तांबडीलाल फुलें पेटल्या अिंगळा-सारखी फुलली होतीं. पलशीवरचीं गोल खोलगट डोण कोरडी ठण-ठणीत होती. आडाचा कासरा देखील सणसणून तापला होता. सद्या हेकण्याला हें सारेंच अंगवळणी पडलें होतें. आपलें मळकट धोतर त्यानें झाडल्यासारखें केलें व गुडघ्यापर्यंत कांचा कसला. छातीवरील माळे-सारख्या मळकट जानव्याखालीं, डंवरलेला घाम कोपरानें पुसला आणि त्यानें कप्पीवरून पोहरा आंत सोडला.

पारी यायची वेळ झाली होती. इनामदारांच्या घरांतील भाराभर कपड्यांचा ढीग भिंतीलगत होता. तोही सुकून कातड्यासारखा झाला होता. हे कपडे धुण्यासाठींच पारी रोज यायची. तिला पाणी काढून देणें हें सद्याचें नित्याचें काम होतें.

पोहरा वरती येतांच, सद्यानें आपले हात ओले करून घेतले व पोहरा डोणींत ओतला. तापल्या तव्यावर जणूं पाणी पडलें. सद्यानें भराभर पोहरे काढून ढोण भरण्यास प्रारंभ केला.

सद्या हेकणे जातीचा कोण होता. हें कुणालाच माहीत नव्हतें. पण त्याचें आडनांव हेकणे नव्हतें हें मात्र निश्चित. त्याच्या तिरळ्या

डोळयामुळें त्याला हें नांव मिळालें होतें. व याच नांवामुळें तो साऱ्या बनपुरींत प्रसिद्ध होता.

तो रस्त्यानें चालला म्हणजे आठ वर्षांखालील सर्व मुली त्याला लाजून पळ काढीत. कारण बहुतेक सर्व जणींच्या वडील माणसांनीं सद्या हेकण्याशीं त्यांचें लगीन करण्याचा मानस बोलून दाखविलेला होता. मात्र यांतलें एकही प्रकरण स्वप्नांत देखील सत्य होणार नव्हतें. कारण, गांवांतल्या कैक चिमुरड्या त्याच्यादेखत लेकुरवाळया होऊन माहेरीं आल्या होत्या व त्याही आपल्या मुलींचीं लग्नें सद्याशींच ठरवीत होत्या. देवीनें डागळलेला काळा चेहरा, ठेंगणी अंगलट आणि तिरळे डोळे या भांडवलावर तो कैकांचा नियोजित जामात होत होता. पण वयाची चाळीशी नजीक आली तरी मांडवाखालीं उभा राहाण्याचा योग त्याच्या आयुष्यांत आला नव्हता.

गेलीं पांच वर्षें तो मोहिते इनामदाराकडे पाणी भरत होता व जेवून खाऊन मिळणाऱ्या सात रुपयांत आपली चैन भागवीत होता. कुरूप आणि दरिद्री असला तरीही तो माणूस होता. आपणाला बायको असावी असें त्यालाही वाटत होतें; पण आपली ही आकांक्षा त्यानें कधीं कुणापाशीं बोलूनदेखील दाखवली नव्हती. आपण म्हणजे साऱ्या गांवाचा उपहास, हें त्याच्या अडाणी मनालाही कळत होतें. पण म्हणून त्याची आशाच खाख झाली होती असें मुळींच नाहीं. शिवेच्या काळ्या मारुतीला त्यानें नवस केला होता व वधूप्राप्तीसाठीं तो आज पांच वर्षे दर शनिवारीं कडकडीत उपवास करीत होता.

ब्रम्हचारी मारुती पावला म्हणा किंवा जन्माच्या साडेसातींत शनी उदरीं आला म्हणून म्हणा; सद्याच्या आयुष्यांत ओलावा निर्माण झाला. गेला महिनाभर इनामदारांच्या घरीं धुणें धुण्यासाठीं येणारी कुळवाडीण ‘ पारू ’ ही त्याच्या आयुष्यांत आलेली पहिली प्रेयसी !

सातआठ पोहरे ओतून सद्यानें डोण भरून टाकली व आपल्या सजणीचें काम हलकें व्हावें म्हणून कपड्यांचा ढीगही धुण्याच्या दंद

शिळेवर रचून ठेवला. एवढें झाल्यावर कानांतली विडी हातांत काढून घेऊन तो स्वैंपाकघरांत गेला व अर्ध्या मिनिटांत ती टेचानें फुंकीत चौकटींतून बाहेर आला. समोरच्या फाटकांतून पारूही आंत आली.

सद्याला बघतांच तिनें नाजूक मुरका मारला, आणि छातीवरचा फाटका पदर उगीचच सरळावरळा केला. भरल्या डोणीकडे लक्ष जातांच तिच्या जाड भुवया वर उचलल्या गेल्या आणि आपला कर्कश्य स्वर शक्य तितका कोमल करून ती लाजत म्हणाली, "पानी भरून ठेवलंय जनू ?"

सदूच्या कानांना तिचा तो भसाडा आवाज देखील एकतारीच्या तारेसारखा मंजुळ वाटला. प्रणयसुलभ विनोदाची लहर येऊन तो म्हणाला. "रानीसाहेबांची तयारी करून ठेवली !"

यावर पारी त्याच्या दृष्टीनें अतिशय गोड हंसली. ओचे खोवून तिनें कपडे भिजवायला प्रारंभ केला. तिच्या त्या काळया पोटऱ्या त्याला मादक, मोहक...अगदीं सर्वांगसुंदर वाटल्या. तिच्या बेढब गालावरील पैएवढ्या आकाराचें काळेभोर ल्हासें त्याला लाख मोलाचें वाटलें.

"पारे !" त्यानें भरल्या आवाजांत हांक मारली.

"काय धनी ?" गळ्यांतल्या मंगळसूत्राची पोत सरळ करीत पारीनें प्रतिसाद दिला. अधिक कांहींच न बोलता तो पुन्हां आडाशीं गेला. त्यानें पोहरा कप्पीवरून आंत सोडला. तो वळून पारीकडे पहात होता. पारीची दृष्टि त्याच्यावर खिळली होती.

पारीचे कोरडे केस, लठ्ठ आंबाडा, बसके नाक, मोठे डोळे, रुंद कपाळ आणि छाती यांत सद्याला मदालसेचें सौंदर्य दिसत होतें—तर सद्याच्या तिरळ्या डोळ्यांत पारीला प्रत्यक्ष मदन दिसत होता.

वैशाखांतल्या भरदुपारीं त्याचें चांदण्यातलें कूजन सुरू झालें.

"मग काय ठरलं तुमचं ?" डोणीच्या तळाचा चिंद्यांचा बोळा काढीत पारू म्हणाली.

" बैस, रोहिदास अगदीं शेजारीं बैस. प्रेमाच्या राज्यांत चांभार मराठा हा भेद नाहीं. साडेपांच वर्षं तुझ्या माझ्या डोळयांनीं आपलीं मनं गुंफलींत. आतां शरीरं कां दूर ? "

रोहिदासाला हटकून वेड लागायची पाळी आली. त्याला एकाएकीं बोलतां येऊं लागलें–

" राधा, राधा, राधा, राधा, " त्यानें कितीदां तरी हांका मारून पाहिल्या.

" बोल रोहिदास ! "

" राधा, तुझ्या हाताला हात लागतांच मला वाचा आली. तुझे हात देवाचे आहेत. " रोहिदास गहिंवरून बोलला.

राधेनें कांहींच उत्तर दिलें नाहीं.

" बोल कीं ग राधा ! "

" तूं बोल, मी ऐकतें ! "

" सहा महिने तूं रागावलीस. मला किती वाईट वाटलं ! त्या दिवशीं नदींत मी तुला ' तशी ' पाहिली. मी तरी काय करूं राधा ? मला राहवलं नाहीं. तुझ्या रूपानं मला वेड लावलं. प्राण गेला तरी पतंग दिव्यावर झडप घालतो, राधा ! राधा, तूं आज अशी येशील असं मला वाटलं नव्हतं. राधा, ज्ञानेश्वर महाराजासारखं मला ज्ञान असतं तर मी तुझ्या गुणांवर ग्रंथ लिहिले असते. तूं सारखी अशी माझ्याजवळ राहा. दाजी पाटील आपल्या आड येतील, गांवकरी आड येतील, आपण इथं राहूंया नको ! या चांदण्या रात्रीं असंच जाऊं या. तुला मला कोणी ओळखणार नाहीं तिथं जाऊंया. कसलं का असेना, माझ्या हातांत कसब आहे. धंदा कोणताही झाला तरी तो चांगला. मी शहरीं पायताणं शिवीन. खूप पैसे कमवीन. माझ्या राणीला सोन्यानं मढवीन—जरीचं पायताण घालून मिरवशील–चल राधा, जाऊंया आपण पळून ! " जणूं जन्माच्या मुकेपणाचें पारणें फेडून घेत होता रोहिदास. राधा त्याच्या गालाला गाल लावून ऐकत होती.

## सद्या हेकणे*

६

माथ्यावर आभाळ जळत होतें. वैशाखी दुपार जणूं साऱ्या जगावर आग पाखडत होती. अिनामदारांच्या परसांतील आळवांचा खड्डा देखील सुकून घट्ट झाला होता. कर्दळी-दुपारीचीं तांबडीलाल फुलें पेटल्या अिंगळा-सारखी फुलली होतीं. पलशीवरची गोल खोलगट डोण कोरडी ठण-ठणीत होती. आडाचा कासरा देखील सणसणून तापला होता. सद्या हेकण्याला हें सारेंच अंगवळणी पडलें होतें. आपलें मळकट धोतर त्यानें झाडल्यासारखें केलें व गुडध्यापर्यंत कांचा कसला. छातीवरील माळे-सारख्या मळकट जानव्याखालीं, डंवरलेला घाम कोपरानें पुसला आणि त्यानें कप्पीवरून पोहरा आंत सोडला.

पारी यायची वेळ झाली होती. इनामदारांच्या घरांतील भाराभर कपड्यांचा ढीग भिंतीलगत होता. तोही सुकून कातड्यासारखा झाला होता. हे कपडे धुण्यासाठींच पारी रोज यायची. तिला पाणी काढून देणें हें सद्याचें नित्याचें काम होतें.

पोहरा वरती येतांच, सद्यानें आपले हात ओले करून घेतले व पोहरा डोणींत ओतला. तापल्या तव्यावर जणूं पाणी पडलें. सद्यानें भराभर पोहरे काढून ढोण भरण्यास प्रारंभ केला.

सद्या हेकणे जातीचा कोण होता. हें कुणालाच माहीत नव्हतें. पण त्याचें आडनांव हेकणे नव्हतें हें मात्र निश्चित. त्याच्या तिरळ्या

डोळ्यामुळें त्याला हें नांव मिळालें होतें. व याच नांवामुळें तो साऱ्या बनपुरींत प्रसिद्ध होता.

तो रस्त्यानें चालला म्हणजे आठ वर्षांखालील सर्व मुली त्याला लाजून पळ काढीत. कारण बहुतेक सर्व जणींच्या वडील माणसांनीं सद्या हेकण्याशीं त्यांचें लगीन करण्याचा मानस बोलून दाखविलेला होता. मात्र यांतलें एकही प्रकरण स्वप्नांत देखील सत्य होणार नव्हतें. कारण, गांवांतल्या कैक चिमुरड्या त्याच्यादेखत लेकुरवाळ्या होऊन माहेरीं आल्या होत्या व त्याही आपल्या मुलींचीं लग्नें सद्याशींच ठरवीत होत्या. देवीनें डागळलेला काळा चेहरा, ठेंगणी अंगलट आणि तिरळे डोळे या भांडवलावर तो कैकांचा नियोजित जामात होत होता. पण वयाची चाळीशी नजीक आली तरी मांडवाखालीं उभा राहाण्याचा योग त्याच्या आयुष्यांत आला नव्हता.

गेलीं पांच वर्षें तो मोहिते इनामदाराकडे पाणी भरत होता व जेवून खाऊन मिळणाऱ्या सात रुपयांत आपली चैन भागवींत होता. कुरूप आणि दरिद्री असला तरीही तो माणूस होता. आपणाला बायको असावी असें त्यालाही वाटत होतें; पण आपली ही आकांक्षा त्यानें कधीं कुणापाशीं बोलूनदेखील दाखवली नव्हती. आपण म्हणजे साऱ्या गांवाचा उपहास, हें त्याच्या अडाणी मनालाही कळत होतें. पण म्हणून त्याची आशाच खाक झाली होती असें मुळींच नाहीं. शिवेच्या काळ्या मारुतीला त्यानें नवस केला होता व वधूप्राप्तीसाठीं तो आज पांच वर्षें दर शनिवारीं कडकडीत उपवास करीत होता.

ब्रम्हचारी मारुती पावला म्हणा किंवा जन्माच्या साडेसातींत शनी उदरीं आला म्हणून म्हणा; सद्याच्या आयुष्यांत ओलावा निर्माण झाला. गेला महिनाभर इनामदारांच्या वरीं धुणें धुण्यासाठीं येणारी कुळवाडीण 'पारू' ही त्याच्या आयुष्यांत आलेली पहिली प्रेयसी !

सातआठ पोहरे ओतून सद्यानें डोण भरून टाकली व आपल्या सजणीचें काम हलकें व्हावें म्हणून कपड्यांचा ढीगही धुण्याच्या दंद

शिळेवर रचून ठेवला. एवढें झाल्यावर कानांतली विडी हातांत काढून घेऊन तो स्वैंपाकघरांत गेला व अर्ध्या मिनिटांत ती टेचानें फुंकीत चौकटींतून बाहेर आला. समोरच्या फाटकांतून पारूही आंत आली.

सद्याला बघतांच तिनें नाजूक मुरका मारला, आणि छातीवरचा फाटका पदर उगीचच सरळावरळा केला. भरल्या डोणीकडे लक्ष जातांच तिच्या जाड भुवया वर उचलल्या गेल्या आणि आपला कर्कश्य स्वर शक्य तितका कोमल करून ती लाजत म्हणाली, "पानी भरून ठेवलंय जनू ?"

सदूच्या कानांना तिचा तो भसाडा आवाज देखील एकतारीच्या तारेसारखा मंजुळ वाटला. प्रणयसुलभ विनोदाची लहर येऊन तो म्हणाला. "रानीसाहेबांची तयारी करून ठेवली !"

यावर पारी त्याच्या दृष्टीनें अतिशय गोड हंसली. ओचे खोवून तिनें कपडे भिजवायला प्रारंभ केला. तिच्या त्या काळ्या पोटऱ्या त्याला मादक, मोहक...अगदीं सर्वांगसुंदर वाटल्या. तिच्या बेढब गालावरील पैएवढ्या आकाराचें काळेभोर ल्हासें त्याला लाख मोलाचें वाटलें.

"पारे !" त्यानें भरल्या आवाजांत हांक मारली.

"काय धनी ?" गळ्यांतल्या मंगळसूत्राची पोत सरळ करीत पारीनें प्रतिसाद दिला. अधिक कांहींच न बोलता तो पुन्हां आडाशीं गेला. त्यानें पोहरा कप्पीवरून आंत सोडला. तो वळून पारीकडे पहात होता. पारीची दृष्टि त्याच्यावर खिळली होती.

पारीचे कोरडे केस, लठ्ठ आंबाडा, बसके नाक, मोठे डोळे, रुंद कपाळ आणि छाती यांत सद्याला मदालसेचें सौंदर्य दिसत होतें—तर सद्याच्या तिरळ्या डोळ्यांत पारीला प्रत्यक्ष मदन दिसत होता.

वैशाखांतल्या भरदुपारीं त्याचें चांदण्यातलें कूजन सुरू झालें.

"मग काय ठरलं तुमचं ?" डोणीच्या तळाचा चिंद्यांचा बोळा काढीत पारू म्हणाली.

" काय ठरायचंय् ! वाटेल तें करून मी तीनशे रुपये कमवणार अन् तुझ्या दारुड्या नवऱ्यापासून तुला सोडवणार, माझी राणी करणार ! पोष्टांत थोडे पैसे आहेत माझे ! "

भरलेला पोहरा घेऊन तिच्यानजिक येतां येतां सद्या निश्चयानें बोलला. डोणींतलें घाणेरडें पाणी हा वेळ पावेतों डोणीच्या तळच्या वेजांतून वाहून गेलें होतें. पारीनें पुन्हां बोळा बसविला आणि वेजं बंद केलें. सद्यानें पोहरा डोणींत ओतला आणि तो तिथेंच थबकला !

" किती पैसं हाईत पोष्टांत ? " पारीनें औत्सुक्यानें विचारलें.

" सव्वीस ! " डोणीच्या कांठावर पाय ठेवून अैटींत उभा राहिलेला सद्या बोलला. " बाकीचे महिन्याभरांत जमवीन ! "

दरमहा सात रुपये कमावणारा, आणि पांच वर्षांत सव्वीस रुपये शिल्लक टाकणारा सद्या, एका महिन्यांत दोनशे चौऱ्याहत्तर रुपये कसे मिळवील ? हा प्रश्नच पारूच्या वेड्या मनाला शिवला नाहीं.

गहिंवरलेल्या आवाजांत ती सांगूं लागली. खाजगीपणाची सुधारलेली कल्पना तिच्यासारख्या भोळया जिवाला कुठून असणार ? " काल रातचं तर माझा दादला मध्यान उलटल्यावर घरीं आला. गटारांतल्या पान्यासारखा तोंडाचा वास होता त्याच्या. तीन हांका ऐकल्यावर मी दाराची कडी काडली. आंत आल्यावर थोड्या वांकड्या शिव्या देत त्यानं मला बकाबक लाता घातल्या. अन् न्हाइतें बरळला. " सांगतां सांगतां तिच्या डोळयांतून पाण्याच्या धारा लागल्या.

" काय म्हणाला काय ?" मनगटाजवळच्या तळव्यानें पारूचे डोळे पुशीत सद्यानें विचारलें.

" त्यो म्हणाला, मला म्हाअीत हाय, त्या सद्या पानक्याचं नि तुजं सूत जमलंय् ...... " पारू मधेंच थांबली. पुढचें तिच्यानें बोलवेना. आवंढा गिळून ती पुढें अितकेंच म्हणाली, " अन् तुमच्याअिशीं न्हाअी न्हाअी तें बोलल्यावर असं पेटलं माजं आंग अन् मी ह्याच्या सनसनून मुस्काटांत मारली धनी !" पारूला पुन्हां रडण्याची उबळ आली. सद्यानें

तिचें मस्तक आपल्या छातीवर घेतलें आणि लहान पोराला समजावतांना त्याच्या पाठीवर थोपटतात तसें मायेनें हलकेंच थोपटून तो तिला समजावूं लागला, " काळजी करूं नकोस पारू. घेजादाखल तुझ्या बापाला त्यानं दिलेले शंभर रुपये आणि तो मागतो आहे तें तुझ्यासाठीं तीन वर्षांत खर्च झालेले दोनशें रुपये सारें देऊन टाकीन मी. मग तरी सोडचिठी देईल ना तो तुला ? " त्याला कुटं बायकूची जरूर हाय ? लगीन झाल्यापासून अस्सा पान्यांत बघतोय मला. पोटभर मार नि घोटभर पानी ह्येच्यावर जगलेंय् मी." पारू पुन्हां स्फुंदूं लागली.

" उगी उगी ! रडावं का असं वेड्यासारखं ? " सद्यानें दोन्ही हात कानशिलाशीं धरून तिचें तोंड आपल्या तोंडासमोर घेतलें. एवढ्यांत पाठीमागून कोणी खाकरलें. पारू चटकन् दूर झाली. सद्यानें वळून पाहिलें. हातांत रंगीबेरंगी कागदी चक्र घेऊन इनामदारांचे चिरंजीव आडासमोरच्या बुटक्या भिंतीवर उभे होते. सद्यानें त्यांच्याकडे पाहतांच त्यांनीं पटक भिंतीच्या पलीकडे उडी टाकली. सद्या घाभाघूम झाला. पारूहि मनांतून हबकली.

परिणाम व्हायचा तोच झाला. आठ वर्षांच्या पोरावर विश्वास ठेवून इनामदारांनीं सद्याला नोकरीवरून काढून टाकला आणि वाड्यांत पाऊल टाकण्याची त्याला बंदी केली. झाल्या दिवसांचा पगार घेऊन वाड्याच्या बाहेर पडतांना बाळासाहेबांनीं सद्याला पुन्हां वाकुल्या दाखविल्या. पाटीवर श्री काढतांना दोन मिनिटें तोंडांत पेन्सिल घालून बसणाऱ्या बाळासाहेबांनीं आपल्या इमानी नोकराला शेवटचा अहेर केला, "वाड्यांत भानगड करतोय् लेकाचा !" सद्याचें डोकें विलक्षण भडकलें. एक मुस्कटांत देऊन बाळासाहेबाला जमिनीवर लोळवावा असा विचार मनांत चमकून गेला पण मस्तक शक्यतितकें शांत ठेवून तो खालच्या मानेनें चालता झाला. रस्त्यांतून जातांना पारू आणि दोनशें चौऱ्याहत्तर रुपयेच काय ते त्याच्या डोक्यांत घोळत होते.

तो घरीं परतला न परतला तोंच मशिदींतून अजां ऐकूं आली. करकरीत तिन्हीसांज झाली होती. सद्यानें चिमणी लावली नाहीं कीं नेहमींप्रमाणें

विडीहि ओढली नाहीं. भुईवरच रकव्याच्या वळकटीशीं टेकून तो विचार करूं लागला. राग, निराशा, अपमान यांच्या संमिश्र भावनेनें त्याचें मस्तक तापलें होतें. कानशिलाच्या शिरा तडातड उडत होत्या. अवर्षणांतल्या दुष्काळासारखा समोरच्या खिडकींतून अंधार वेगानें येत होता. विचाराच्या तंद्रीतच त्याचा केव्हां डोळा लागला हें त्याचें त्यालाहि कळलें नाहीं.

सकाळीं कोणाच्या तरी दार ठोठावण्याचा आवाज ऐकून तो जागा झाला. शिदू पाटलाचा मुलगा मल्हारी दार उघडतांच त्याच्या दृष्टीस पडला.

" काय हो ?" सद्यानें विचारलें.

" बामणाच्या हिरींत घागर बुडलीया ती काढायपाई बोलावलंय् बाबानं. "

सद्याच्या निराश अंत:करणांत पुन्हां एक आशेचा किरण चमकला. आपण बुडण्यांत पटाईत आहोंत आणि हा धंदा करूनहि जेमतेम पैसा मिळवतां येईल. कांहींहीं विचार न करतां त्यानें टोपी सदरा घातला आणि ' चल ' म्हणून तो मल्हारीच्या मागोमाग निघाला. खोलीला कुलूप लावतांना मात्र कालच्या व आजच्या दिवसांतला फरक त्याला तीव्रतेनें जाणवल्यावांचून राहिला नाहीं. काल सकाळीं तो नेहमींप्रमाणें इनामदारांच्या घरीं गेला होता आणि आज...... ?

पांचशें घरांच्या बनपुरींत किती वस्तू आडाविहिरींत पडणार आणि त्यांतून सद्याला कितीसा पैसा मिळणार ! अक्षरश: अर्धपोटीं राहून सद्या दिवस कंठींत होता. पारीची गांठ घेण्याचीहि त्याला आतां लाज वाटत होती. गेल्या सर्व महिन्यांत पोस्टाच्या पासबुकांत त्याच्या नांवावर सव्वीसच्या जागीं सत्तावीस देखील झाले नव्हते आज दुपार टळून गेली तरी त्याला आंघोळीला जावेसें वाटेना. शेवटीं कांहींतरी केलें पाहिजे म्हणून आपला एकुलता एक मळका सदरा आणि फाटकें धोतर काखोटीला मारून तो ओढ्याकडे जायला निघाला.

ओढा गांवच्या दुसऱ्या बाजूस असतां तर बरें झालें असतें असें त्याला नेहमींच वाटे. कारण, बरोबर या ओढ्याच्या कांठावरच मोहिते

इनामदारांचा वाडा होता. वेळीं अवेळीं केव्हांहि ओढ्यावर गेले तरी सद्याच्या छोट्या शत्रूची तेथें अचूक गांठ पडे. कुठल्यातरी पोरकट खेळाच्या निमित्तानें इनामदारपुत्र बाळासाहेब ओढ्याच्या कांठानें वा वाळूंतून वावरतांना दिसत. आणि त्याला पाहिलें कीं सद्याचें मस्तक हमखास तापून जाई. वरखालीं ओढ्यांत कुठेंतरी दूरवर जाणें अशक्य नव्हतें; पण वनपुरीचा ओढा पाण्यावांचून वाहणारा ओढा म्हणून प्रसिद्ध होता. आणि हल्लीं तर कोरडी ठणठणीत वाळू आणि शिरगोळे याशिवाय त्यांत कांहींच नव्हतें. नाहीं म्हणायला इनामदारांच्या वाड्याच्या पिछाडीला उजव्या बाजूस पांचपन्नास हातांवर एक डोह होता व सद्याच्या अभ्यंगस्नानाला याशिवाय दुसरी जागाच नव्हती.

दरडीवरून उतरून सद्या डोहाजवळ आला. डोहाच्या कांठावर बसून कागदी होड्या पाण्यांत सोडीत असलेले बाळासाहेब त्याच्या दृष्टीस पडलेच. त्याच्या अंगाचा तिळपापड झाला. आणि कां कुणास ठाऊक पारू आणि दोनशें चौऱ्याहत्तरचें अग्निचक्र त्याच्या डोक्यांत गरगर फिरूं लागलें. बाळासाहेब आपल्याच नादांत गुंग होते व भर उन्हांत वाळूंत उभे राहून इनामदारसाहेब आपल्या चिरंजिवांचें कौतुक पाहात होते. सद्याला वाटलें, जावें इथूनच परत आणि तो वळला देखील. तो दहापंधरा पावलें गेला असेल नसेल तोंच त्याच्या कानावर कर्कश किंकाळी आली. इनामदार जोरजोरानें ओरडत होते, "बाळासाहेब! कुणीतरी धांवा......" पोर बुडालं......पोर बुडालं......" चिरंजिवाप्रमाणें इनामदारसाहेबहि पोहण्याच्या कलेंत अज्ञात होते. जागच्याजागीं थयथय नाचून इनामदारसाहेब हंबरडा फोडीत होते.

श्रीमंत वा गरीब पित्याचें अंतःकरण सारखेंच! नावेपाठोपाठ डोहांत गेलेले बाळासाहेब पाण्याच्या बुडबुड्यासह वर आले.

"बाळासाहेब!" पित्यानें पुन्हां हंबरडा फोडला.

"धांवा धांवा......पोर बुडालं!"

"ठीक झालं बुडालं तर......सदयाच्या मनाला कसलातरी विल-

क्षण हर्ष झाला. आणि मरत्या शत्रूला एकवार पाहावें म्हणून त्यानें तोंड वळविलें. इनामदारांची आणि त्याची दृष्टादृष्ट झाली. पाण्यावर पुन्हां बुडबुडे आले. पुन्हां एकदां बाळासाहेब वर आला. इनामदार सदयाकडे धांवले. सदूही थोडासा परतला. इमानदारांनीं अक्षरशः त्याचे पाय धरले. अधिक बोलणें शक्य नव्हतें.

" सदू ! सदू ! माझा बाळ बुडाला. त्याला वांचव ! " इनामदारांचे डोळे वितळत होते. एखाद्या अर्भकासारखे ते नाचत होते. मनाचा धोंडा करून सदू उत्तरला, " दोनशेंचौऱ्यात्तर रुपये द्याल तर......"

" मागशिल तें देईन. पण सदू, माझा बाळ..."

" आधीं ..... आत्तां...... " सद्या कठोरपणानें बोलला.

" बाळासाहेब ! बाळासाहेब !" असा एकसारखा आक्रोश करीतच इनामदारांनीं आपल्या गळयांतलीं सांखळी तोडली नि ती सद्याच्या हांतांत दिली.

" चार तोळयांची आहे. माझ्या बाळाला वांचीव...बाळासाहेब !" इनामदार पुन्हां आक्रोश करूं लागले.

डोह शांत झाला होता. सद्यानें घाईनें ती सांखळी आपल्या मळक्या सदऱ्यांत गुंडाळून तिथेंच ठेवली आणि विजेच्या वेगानें धांवून त्यानें पाण्यांत उडी घेतली.

बापड्या, पोर, थोर, जो तो ओढ्याकडे धांवूं लागला. शोक–आक्रोश, ओरडा–हलकल्लोळ माजला.

उडीसरशीच सद्याच्या पायाला बाळासाहेब लागले. त्यानें त्यांना पायानेंच वर उचलून घेतलें. पाण्यावर पुन्हां बुडबुडे उठले. बाळासाहेबांचा प्रेतवत्‌देह छातीशीं धरून सद्या वर आला. पण त्याला तो झेपेनासा झाला होता. तोहि गटंगळया खावूं लागला. दोघेहि पुनःपुनः बुडत, पुनःपुनः वर येत. सद्या हांक मारण्याची शिकस्त करीत होता. बोलायला अवसरच नव्हता. तो नुसता हात वर करी. वाळूंतली गर्दी आरडाओरड करी. पुन्हां दोघे बुडत. कुणालाच कांहीं सुचेना. एकासाठीं दुसरा जीव मरत होता.

इनामदार तर दातखिळी बसून निश्चेष्ट पडले होते. गर्दीतून कुणी माउली धांवून आली आणि भरवेगानें कमरभर पाण्यांत घुसली. जनलज्जेची तमा न धरतां तिनें आपल्या अंगावरची सोळा हात साडी सोडून विजेच्या वेगानें पाण्यांत फेंकली. बुडत्याला काडीचा आधार सांपडला. तसल्या ग्लानींताहि सद्यानें एका हातानें तिचें टोंक आवळून धरलें. आतां दहावीस बघे मंडळी पाण्यांत धांवली. आणि त्यांनीं दोन प्रेतवत् देहांना ओढून कांठाशीं आणलें. मंडळींनीं चपळाईनें बाळासाहेबांना उचलून घेतलें.

" धनी ! " पारूनं सद्याला मिठी मारली.

बाळासाहेबांना खांद्यावर टाकून कोणी भरवेगानें धांवलें. गर्दीचा लोट श्रीमंतांच्या दु:खामागें गेला. बेशुद्ध झालेल्या इनामदारांनाहि कुणी उचलून नेलें. साऱ्या ओढ्यांत आतां शुकशुकाट झाला. पारूच्या भीषण हंबरड्यावांचून कसलाहि शब्द ऐकूं येत नव्हता.



* ' देव पावला ' सिनेमाची गोष्ट.

## लावसट

## ७

गांवदरीचा जिराइत तुकडा आवंदा राजागत पिकला होता. पोटा-पुरतं धान्य घरीं ठेवून वेऊन शिदू-गोविंदानें दोनशें रुपयांचें धान्य खुद्द सरकाराला ओपलं. महाबळेश्वरला राहिलेला संस्थानिक आणि सुगी पदरांत पडलेला शेतकरी, दोघे सारखेच निश्चित.

झोंपडीसमोरच्या सारवलेल्या अंगणांत शिदू दोस्तांसह बसला होता. चांदणं टिप्पूर पडलं होतं, अंधाराबरोबर शिदू आणि त्याचा काळाकुट्ट दोस्त देखील चांदण्यानं उजळून गेले होते. गप्पांना मारे रंग चढला होता. भांग म्हणे चढवावी तितकी अधिक चढते. गप्पांचंही तसंच. जितक्या लंब्याचवड्या कराव्यात, तितक्या अधिक रंगदार ! पोथींत प्रारंभीं श्रीग-णेशा असला तरी मध्यावर लढायांचीं वर्णनें येतात. आजच्या गप्पांचा आरंभ झाला गुजावरून. गुजा ही शिदूची बायको. सुगी साधल्यामुळें शिदूचें पोट आनंदानें भरलं होतं, तर गुजाच्या पोटांतही कसलातरी आनंद दिवसामासांनीं वाढत होता. बोलणीं निघालीं तीं त्याच्यावरूनच. शेजारच्या वस्तींतली रखमा वाऱ्याला बसतां बसतां सहज म्हणाली,

" बाई, खवणीच्या वाड्याकडं जात जाऊं नका तिन्हीसांजचं. एऱ्हीचं वायलं नि आत्तांचं वायलं. खवणीच्या वड्यांत लागीर हाय म्हनं ! "

झालं. विषयाला तोंड फुटलं. बाप्येमंडळींनींही गप्पांत भाग घेतला, आणि भुताखेतांची शिरगणति सुरू झाली. पांचेगांवच्या रानांत चकवा

पडून आपण बैलासंगतीं चार पार कसं आबधलों, तें रखमाच्या नवऱ्यानं हिंगमीठ लावून सांगितलं; तर पवाराच्या लिंबाखालीं अवसेच्या रात्रीं मध्यान्हीला आंवोळ करीत बसलेल्या पांढऱ्याशिप्पूरे बाईचं वर्णन शिदूनं केलं. तें ऐकून गुजा भेदरून गेली. आडरानांत असल्या गप्पा ऐकून छातींत धस्स व्हायचं, पण भागुबाईपण पदरीं येईल म्हणून ती ऐकत होती. झोटिंग डाकिणी, जखिणी, मुंजा यांच्या कथा झाल्यावर रखमाच्या नवऱ्यानं साव-सटीचा अध्याय लावला.

"दाढंखालीं वाळूक रगडावं, तशीं कवळीं पोरं दांताखालीं रगडती लावसट!"

"पुरं!" रखमानं त्याला मध्येंच गप्प केला. गुजालाही आतां कापरं भरल्यासारखं झालं होतं. आतांपर्यंत साऱ्या कथा ऐकत, खाटेखालीं पडलेली द्वारकी कुत्री देखील कान फडफडून उभी राहिली. पोरं खाणाऱ्या भुताची ती गोष्ट तिला देखील भयानक वाटली.

"तुमीबी हिच्यागत घाबरलासा व्हय् वयनी! अवं पोरं खाती मंजे काय अजाब नाहीं अितकं. मांजरी दिकून व्याल्याबराबर पयलं पिल्लूं मटकावती!"

द्वारकीच्या अंगावर कांटा आला. स्वतःचीं पोरं खाणाऱ्या मांजराच्या अवलादीबद्दल एकदम शिसारी आली. पुढच्या गप्पा ऐकायला ती थांबली नाहीं. रानवटींत कांहीं दिसल्याचा बहाणा करून ती तिकडे धांवली. गप्पा आणिक लांबल्या का तिथंच आखडल्या कोण जाणे!

नांगरटींतच भुसभुशीत माती पायानं उकरून, द्वारकीनं अंथरुण बनवलं आणि अंगाला विळखा देऊन ती आडवी झाली. भुताखेतांच्या गप्पा तिनं आजवर खूप ऐकल्या होत्या पण मांजरी आपलीं पोरं खाते ही भयंकर गोष्ट आजच तिच्या कानांवर आली होती. आणि शिदूच्या घरची मनी मांजरी तर तिची जिवाची मैत्रिण होती. तिनं आपल्या जातीचीं अनेक वैशिष्टयं द्वारकीला सांगितलीं होतीं पण हा प्रकार मात्र कधींच सांगितला नव्हता. दुधावर जगणारी मांजराची जात इतकी भयंकर

कशी असूं शकते. याचं तिला आश्चर्य वाटत होतं मनीशीं मैत्री करणं प्रशस्त नव्हे असं तिला वाटूं लागलं होतं तशांत मनी आतां व्यायला झाली होती. ती व्याली म्हणजे आपला पोटचा गोळा खाईल... शीः... द्वारकीचं अंग पुन्हां शहारलं. उद्यां या गोष्टीबद्दल मनीला स्पष्टच विचारायचं ठरवून तिनं पोटांत मान घातली. द्वारकी रात्रीं गाढ अशी झोंपत नसे. दिवसा झोंप घेऊन रात्रीं पहारा करीत असे ती. आज तिची अवस्था मोठी चमत्कारिक झाली. जाग राहावेना आणि झोंप येईना. रखमाच्या नवऱ्यानं सांगितलेली ती लावसट कराकर पोरं खाते आहे !... मनी आपल्या पोराला फाडून खात आहे ..! हींच दृश्यं द्वारकीच्या अर्ध्या मिटल्या डोळयांना आलटून पालटून दिसत होतीं !

शुक्राच्या तारा आतां स्पष्ट झाल्या. झोंप अगदींच येईनाशी झाल्यामुळें द्वारकी त्याच्याकडे टक लावून बसली होती. रंगाच्या सारखेपणाचा मेळ कीं मनाचा खेळ, कुणास ठाऊक त्या शुक्राच्या जागीं द्वारकीला मनीचे भयंकर डोळे दिसूं लागले. द्वारकी संतापली—दोन पायावर बसून तिनं शुक्रावरच भुंकायला प्रारंभ केला."हाड्,अग उगाच का वराडतीस ?" असं शिदू त्रासून ओरडला तेव्हां कुठं द्वारकी भानावर आली. जबरदस्तीनंच डोळे मिटून घेऊन तिनं पुन्हां शरीराला संक्षेप दिला. पहांटेच्या गार झुळुका मस्तकावरून निथळूं लागतांच ती गाढ झोंपी गेली.

—द्वारकी झोंपेतून जागी झाली तेव्हां तिला एक भलतंच भयानक दृश्य दिसलं. रानांत पालथ्या घातलेल्या लोखंडी मोटेवर मनी उभी होती आणि तिच्या तोंडांत एक गोजिरवाणं पोर होतं. द्वारकीला वाटलं आतां ती पोर खाणार ! वाघिणीच्या उड्या टाकून मोठ्यानं भुंकत ती मोटेजवळ गेली आणि एकदम ओरडली, "खालीं ठेव तें पिल्लूं !"

मनीनं पिलूं खालीं टाकलं. त्यानं खोल असा आर्त आवाज केला. मनी शेंपटी वर करून मैत्रिणीला सांगूं लागली. " कालच चार बाळं झालीं मला. पद्धतीप्रमाणं जागा पालटायला नेतेय् यांना !"

" लावसटे !" द्वारकी संतापून ओरडली, "खोटं किती बोलतेस ?

मला सारं समजलं आहे ! तूं खाणार आहेस त्या पिलाला. असली कसली ग हराम जात तुमची !"

मनीनं मोटेवरून खाली उडी टाकली. ती द्वारकीला बिलगूं लागली. द्वारकी चटकन् मागें झाली अन् म्हणाली, " तुझा स्पर्श देखील नको मला. स्वतःचं पोर खाणाऱ्या तुमच्या जातीशीं कुणी कशी मैत्री करावी ?"

" अस्सं ! " मिशा पिंजारून मनी ठिसकली. " माणसाच्या म्हणण्यावर विश्वास बसला तर तुझा. स्वार्थासाठीं आपलं पोर मारायला माणसं धजतील मांजरं नव्हेत !"

"पुरे !" द्वारकी म्हणाली. "अन्नदात्याला निंदतेस यांतच समजली तुमची नीति !"

मनीचे खुनशी डोळे दुभंगले आणि अेक पंजा उचलून तिनं द्वारकीवर हल्ला केला. द्वारकीनं चपळाईनं अंग चोरलं.

" याद राख, खांडोळी करून टाकीन !" द्वारकीनं दम भरला.

" लाचार, माणसापुढं शेपटी घोळणारी तूं ! माणसाची जात हराम. आम्हां कुत्र्याबद्दल देखील तीं असंच म्हणतात !"

" काय ? "

" तुम्हीही आपलीं पोरं खातां ? "

" खबरदार ! " जबडा उघडून द्वारकीनं मनीची पाठ हातांत धरली आणि चेलमाडून कोलमाडून तिला दूर फेंकून दिलं. " नादान, चालती हो या घरांतून ! "

" मी तर जातेंच. पण तुझी जात काय मोलाची आहे तेंहि एके दिवशीं दाखवीन तुला !—मोटेपाशीं जाऊन मनी ठिसकारली आणि पिलूं दातांत धरून पुन्हां चालूं लागली. मोटेंत खडखड झाली त्यावरून तिचीं कांहीं पिलें मोटेखालींही असावींत. पिलूं दातांत धरून जाणाऱ्या मनीकडे द्वारकी संतापानें पाहात राहिली होती. त्या पिलाला ती खाणार या कल्पनेनं तिनं डोळे मिटून घेतले.

बाकीचीं पोरं घेऊन मनी केव्हां चालती झाली तें द्वारकेला समजलं नाहीं. मांजरी घारांतून गेली म्हणून गुजानं जरा शोधाशोध केली व उंदराच्या बंदोबस्तासाठीं गांवांतून दुसरी मांजरी आणली. पण द्वारकीनं तिलाही पिटाळून लावलं. मांजर म्हटलं कीं ती तुटून पडूं लागली. लांडग्यापेक्षांही मांजराच्या जातीशीं तिचं शत्रुत्व कडवं झालं. काळ कुणासाठीं थांबतोय् थोडाच. मांजराबरोबर महिनेही गेले. गुजा बाळंत झाली. तिला गोजिरवाणं बाळ झालं. द्वारकी त्याला खेळवूं लागली. रानांत कामाला जातांना पोराला द्वारकीवर सोंपविण्यांत गुजाला कांहींच वाटत नसे—द्वारकी होतीच तशी इमानी.

यंदाची सुगी पार बुडाली. दीड एकराच्या तुकड्यांत दीड चिपटें धान्य सुद्धां हातीं लागलं नाहीं. पैसा देऊनही गांवांत धान्य मिळेना. शिदूगोविंदाच्या घराची उपासमार व्हायला लागली. शेवरीच्या जळक्या लाकडासारखा शिदूगोविंदा किडकिडीत काळाठिक्कर पडला. गुजाला दूध येईनासं झालं. बाळ रात्रंदिवस रडायला लागला. द्वारकीचं पोट पाठीला लागलं. ओला—वाळला तुकडा तिला दुर्मिळ झाला.

रानांत अेकादा ससा गावला तर द्वारकी तो मारून घरांत आणून टाकी. शिदू, गुजाच्या पोटाला तितकाच आधार मिळे. सुगीचे दिवस हे असे गेले. दिवसेंदिवस दुष्काळाचा जोर वाढला. गांवांत भुकेनं माणसं पटापट मरायला लागलीं. गांवांत, रानांत सर्वत्र रडण्यावांचून दुसरा स्वर ऐकूं येईनासा झाला. पोटाला अन्न नाहीं अन् लाज झाकायला कपडा नाहीं. शिदू अन् गुजा बाहेर पडेनाशी झाली. द्वारकीही दिवसभर खाटेखालीं पडून राहूं लागली. तिच्या अंगांत आतां मुळींच त्राण उरलं नव्हतं. काळच फिरला. तीन जिवंत माणसं नांदत असूनही शिदू—गोविंदाच्या झोंपडींत दिवा लागेनासा झाला. रात्रींच उठून शिदू एकाद्या दिवशीं चिंचेचा पाला ओरबाडून आणी आणि आधाशासारखा खाई. गुजाला तोही खातां येईनासा झाला. बाळ तर आतां जित्या मढ्यासारखाच दिसूं लागला होता. द्वारकीच्या अंगात रक्त असं अजीबात उरलं नव्हतं. शेजारपाजारची कुत्री येत व तिला स्मशानांत बोलावत. पण तिथपर्यंत चालत जाण्या-

इतकी शक्तीही आतां द्वारकींत उरली नव्हती.–शिदूनं खाऊन टाकून दिलेल्या चिंचेच्या काड्या पडल्या पडल्याच ती दाताखालीं रगडी व टाकून देई. तिला त्या खातां येत नसत.

आवसेची काळरात्र होती ती. झोंपडींतून एक भयंकर हंबरडा ऐकूं आला. गुजाचा होता तो आवाज. तसा आवाज एकदा दोनदां द्वारकीच्या कानावर आला. उठवत नव्हतं तरी जिवाच्या करारावर ती उठून उभी राहिली. हंबरडा पुन्हां ऐकूं आला नाहीं. काय झालं कुणाला ठाऊक? पेंगळून द्वारकी पुन्हा खाटेखालीं पडली. तासभर निघून गेला. तिच्या पोटाला आतां कांहीं मिळालं नाहीं तर मरण तिला घेऊन जाणार होतं. अर्धा तास निघून गेला. द्वारकी पाय झिंजाडत होती. पोटाच्या वेदना असह्य होऊन ती ओरडूं लागली. तिच्या रडण्याचा भयाण भयंकर स्वर निघूं लागला. तिचा तिलाही तो ऐकवत नव्हता पण इच्छेविरुद्ध रडत होती ती

"हाड्!" शिदू प्राणपणानं ओरडला. शक्यतितक्या प्रयासानं द्वारकीनं डोळे उघडून पाहिलं. अंधारांत दिसतं कुत्र्याला. उघड्या वाघड्या बाळाला हातीं धरून शिदू नांगरटीकडे चालला होता. त्याचे पाय लटपटत होते. द्वारकी अंगांत वीज भरल्यासारखी उठली. आणि हेलपाटत हेलपाटत शिदूच्या पाठोपाठ चालूं लागली.

द्वारकीनं बसण्यासाठीं केलेल्या एका उथळ खड्ड्याजवळ शिदू थांबला. त्यानं पोर त्यांत टाकलं. 'देवा!' म्हणून तो एकदां ओरडला आणि बाळाच्या प्रेतावर त्यानं चारदोन ढेंकळं सारलीं. चंपीच्या तोंडांतून पुन्हां तसलाच भयंकर स्वर निघाला.

"हाड्!" शिदूनं एक ढेकळ द्वारकीच्या रोखानं फेकलं. द्वारकी गप्प झाली आणि तिरिमिरी येऊन तिथंच पडली. पुढं काय झालं तें तिला मुळींच कळलं नाहीं.

थोडा वेळ निघून गेला. कुठून तरी दुरून तिला आपल्या जातभाईंचा सांघिक आक्रोश ऐकूं आला. तिनं डोळे उघडले. किट्ट अंधारांत

दूरवर चार पांच चिता पेटलेल्या दिसत होत्या व जाळाच्या प्रकाशांत कुत्र्याच्या उभ्या सांवल्या अंवतीं भंवतीं वावरतांना दिसत होत्या. स्मशानच तें. चंपीच्या मरत्या मनांत कांहींतरी चमकलं. ती उभी राहिली. हेलकांडे जातच होते. शिदूनं बाळाला ठेवलं त्या जागेपाशीं ती गेली. ढेकळांनीं अर्धवट प्रेत झांकलं गेलं होतं. कसलाही विचार न करतां तिनं बाळाच्या तोंडाचा लचका तोडला. वांकडं तोंड करून ती मांसाचा तुकडा चघळूं लागली. कैक दिवसांच्या उपाशी जिभेला रक्त लागतांच ती चटकन् पिऊं लागली. डोळे मिटून तिनं बैठक ठोकली व पुढच्या दोन्ही पायांत धरलेला मांसाचा तुकडा कुरताडून चघळायला प्रारंभ केला—एवढ्यांत—

" म्यांव !"

होय. मनीचाच आवाज तो. द्वारकीनं डोळे उघडले. मनीचे दोन डोळे नांगरटींतून चमकत होते. द्वारकीच्या छातींत धस्स झालं.

" लावसट, धन्याचं पोर खातेस ? किती हराम तुमची जात !" मनी किनऱ्या उंच आवाजांत म्हणाली. द्वारकीच्या नाड्या एकदम सैल पडल्या. सैल होतां होतां एकदम आवळल्या. तिचे चारी पाय ताणले गेले. डोळे अधिक रुंद होऊं लागले. तिच्या डोळयांना अजून मनीचे भयंकर डोळे दिसत होते. कानांत किनरा आवाज घुमत होता. 'लावसट ! लावसट !' तिनं उठण्यासाठीं धडपड केली. धडपड, तडफड, —तिनं पुन्हां चारदोनदां पाय झिंजाडले. आणि—आणि काय सारी शांतता. शेजारच्या ढेकळाइतकीच निश्चल होऊन द्वारकी तिथं पडली. चमकणारे दोन डोळे रानांत दूर दूर जाऊं लागले. बाळाची आणि द्वारकीची—दोन प्राणज्योतीच जणूं—नांगरटींतून जात होत्या.



गुरुदेवांनीं जिवंत समाधी घेतल्यानंतर जवळ जवळ पाव संवत्सरानें मुक्तानंद परत आश्रमांत आला. वंग देशांतील एका राजाच्या समाधानासाठीं गुरुदेवांनीं आपला देह त्याच्याच राजधानींत ठेविला होता. त्यांच्या नांवानें त्या विद्यापीठाच्या कार्याची व्यवस्था लावण्यांतही मुक्तानंदाचा थोडासा काळ खर्च झाल्यावांचून राहिला नाहीं. मुक्तानंदानें तिथेंच राहून विद्यापीठ चालवावें अशी राजाची इच्छा होती. पण कुठल्याही श्रेष्ट वा क्षुद्र कार्यासाठीं आतां लौकिक जगांत मिसळावयाचें नाहीं असा मुक्तानंदाचा निश्चय होता. गुरुदेवांच्या समाधीला शेवटची वंदना करून व राजाला आशीर्वाद देऊन, तपश्चर्येच्या पूर्ततेसाठीं तो उल्हसित मनानें पुनः आश्रमाकडे आला होता.

हेमंताच्या अप्रिय आगमनानें सृष्टि उदासीन आणि हिमपांडुर झाली होती. आश्रमाच्या आसमंतांतील वृक्ष पर्णहीन झाले होते. फांद्याचे हात उंचावून वाऱ्याच्या मुखानें ते ओंकाराला प्रार्थना करीत, "देवा, सोडव या हेमंताच्या कचाट्यांतून!" काळ्याकभिन्न दगडावर बर्फाचे तुषार पडल्यामुळें दग्ध प्रेतांवर राख पसरल्याचा भास होत होता व वेलींचीं कृष शरीरें निरुपयोगी दोरखंडें पडल्यासारखीच वाटत होतीं. सृष्टीची ती अवदशा पाहून, मुक्तानंदाच्या कपाळावर आंठी पडली नाहीं कीं त्याची तेजस्वी अंगयष्टि शहारली नाहीं. उलट त्याच्या प्रसन्न चेहेऱ्यावर उपहासाचीच

एक लकेर स्पष्ट दृश्यमान् झाली. सृष्टींतील सुखदुःख त्याच्या सिद्ध दृष्टीला केवळ विनोदविषय झालें होतें.

येतां येतांच गंगोत्रीच्या स्तब्ध पाण्यांत त्यानें स्नान उरकलें होतें व भस्मार्चन, जटाबंधन इत्यादि नैमित्तिकेंही आटोपलीं होतीं. आश्रमीय ओंवरींत प्रवेश करण्यापूर्वी त्यानें कमंडुलंतील गंगोदक आपणापुढें समंत्र ओंवरींत फेकलें. त्याच्या चाहुलीनें आंतील खबदाडांत झोंपलेले दोन तीन वाघ जागे झाले व डोळे उघडून त्यांनीं 'घुर्रर' असा आवाज केला. त्यांच्या स्वप्नाळू डोळयांना मुक्तानंदाची मूर्ति दिसतांच त्यांनीं परत डोळे मिटून घेतले.

एका विशाल शिलेवर व्याघ्रांबर पसरलें होतें. व त्याच्यावर दोन तान्हीं हरिणशावकें बसलीं होतीं. तीं किंचित् बावरलीं· पण मुक्तानंदानें तिकडेही लक्ष दिलें नाहीं. गुरुदेवांच्या रिकाम्या आसनाकडे स्थिर दृष्टीनें पाहाण्यांत तो गढून गेला होता. बराच वेळ त्या आसनाचें दर्शन घेतल्या-नंतर त्यानें धुमीशेजारच्या मृत्तिकापात्रांतील लोहखंड व अग्निपाषाण काढला व परस्परावर त्यांचे आघात करून विस्तव निर्माण केला. ओंव-रीच्या कोपऱ्यांत रचलेलें इंधन काढून त्यानें धुमी पेटविली व प्रणाम करून तो गुरुदेवांच्या आसनावर चढला. तें आसन आतां नियमाप्रमाणें त्याचें झालें होतें. पद्मासन घालून त्यानें श्वास आंत ओढला. आणि ॐ च्या दीर्घ उच्चारासह ओठ मिटून घेतले. तो आतां समाधींत प्रवेश करणार एवढ्यांत आपल्या अंगावर एकादा लहानसा बर्फखंड पडल्याचा त्याला भास झाला. तेवढ्यानें अर्थातच त्याचे स्नायू हालले नाहींत कीं पापण्या चळल्या नाहींत. पण 'योगिराज अभय. योगीराज अभय' असा अगदीं चिंचोळा मानवी आवाज जेव्हां दोन तीनदां त्याच्या कानांत शिरला तेव्हां मात्र त्यानें डोळे उघडले. समाधीभंग करण्याच्या बर्फपर्वतालाही जाळून टाकतील इतके त्याचे डोळे रसरशीत दिसत होते. एका क्षणांत त्यानें आपली सक्रोध दृष्टि साऱ्या ओंवरींतून फिरविली पण मानवी आकृति त्याला दिसली नाहीं.

' अभय ! अभय ! ' तोच आवाज कांपरा होऊन पुन्हां त्याच्या कानांना भिडला.

" कोण आहे ? " योग्यानें संतापून विचारलें.

" मी...मी...आहे ! " आसनाच्या डाव्या बाजूकडून, भूगर्भातून आल्यासारखा तो आवाज पुन: आला. योग्यानें न्याहाळून पाहिलें. आसना-बाहेरच्या निरुंद शिलातलावर एक लांबटसा बर्फाचा तुकडा पडला होता व तिथूनच कुठूनतरी तो आवाज येत होता. होय, त्या बर्फाच्या तुकड्याचे ओंठ हलल्याचेंही त्याला भासलें. आतां मात्र क्रोधाची जागा औत्सुक्यानें घेतली. करड्या स्वरांत कोवळें मार्दव आलें—"तूं कोण आहेस ? यक्ष कीं किन्नर ?" —मुक्तानंदानें त्या सजीव बर्फखंडाला विचारलें.

" महाराज, मी यक्ष, किन्नर कोणी नाहीं. मच्छरांच्या हिंसेवर आपलं निरर्थक जीवन जगविणारी एक क्षुद्र पाल आहे. माझं नांव हिमांगी. "

" हिमांगी ? " योग्याच्या चेहेऱ्यावर हास्य उमटलें.

" होय. इथले ते वृद्ध योगिराज कुठं आहेत ?"

" त्यांनीं सदेह समाधी घेतली ! "

" तर मग योगिराज आपण कोण ? "

" मी त्यांचा पट्टशिष्य ! "

" आपणही गुरुदेवासारखेच सिद्ध असाल ! महाराज, माझ्यावर दया करा ! "

" पण हिमांगी, तूं मानवी भाषेंत बोलूं कशी शकतेस ?" योग्यानें आश्चर्यातिरेकानें विचारलें.

" तें तेंच नको आहे मला. महाराज, मानवी भाषा समजण्याचं माझं हें विषारी ज्ञान नाहींसं करून टाका." आपण सिद्ध आहांत हिमांगी काकुळतीनें म्हणाली.

" ईश्वरी वरदान नाहींसं करण्यासाठीं सिद्धाचं सामर्थ्य नसतं हिमांगी ! "

" ईश्वरी वरदान नव्हे. आपल्या गुरुदेवांनीं सिद्धीचं सामर्थ्य अजमाविण्यासाठीं माझ्यावर हा प्रयोग केला होता... !"

मुक्तानंदाची उत्कंठा अधिकच वाढली. अजीजीनें तो त्या पालीला म्हणाला; " तर मग देवी, आपला सर्व वृत्तांत मला सांग ! "

" नंतर माझी याचना पुरवाल ? "

" अगत्य. ये, बैस अशी माझ्या स्कंधावर ! "

" छे ! छे ! योगिराज हें काय भलतंच ? पुष्पमालाची जागा मी पामर कशी घेऊं ? "

" हिमांगी, तुझ्या माझ्यावर एकाच गुरुदेवांनीं अनुग्रह केला. तूं माझी धाकटी गुरुभगिनी आहेस. भावाच्या स्कंधावर बसायला बहिणीला संकोच कसला ? चल ये... ! "

नाइलाजानें हिमांगी त्याच्या बाहूवरून स्कंधावर गेली. मुक्तानंद एकाग्रचित्तानें ऐकूं लागला. व हिमांगी पुढें सांगूं लागली—

" त्यांनीं कमंडलुंतून कसलंतरी तीर्थ माझ्या अंगावर शिंपलं. माझ्या अंगांतून एक सणक निघून गेली व त्वचेवरचा पापुद्रा देहापासून वेगळा झाला. माझं अंग मला निशिगंधाच्या फुलासारखं हलकं, रसरशीत व सुवासिक वाटूं लागलं मीं आश्चर्यानं दृष्टि वर केली तों गुरुदेवांचे शब्द माझ्या कानीं पडले ! "

" आतां नाहीं ना तुला थंडी वाजत ?"

"आणि आश्चर्याची गोष्ट.त्यांचे शब्द मला समजले. आम्हां पालींना आमच्या भाषेखेरीज अन्यभाषा मुळींच कळत नाहींत. उत्तरासाठीं मीं ओठांची चाळवाचाळव केली. आश्चर्याचा अतिरेक झाला. अगदीं सुस्पष्ट मानवी भाषेंत मीं त्यांना उत्तर दिलें !—

" आपल्या कृपेचं आवरण माझ्या अंगावर असतांना मला शीतोष्णाची बाधा कशी होईल ? "

"गुरुदेवांचा चेहरा सूर्यकमळासारखा प्रफुल्लित झाला. आनंदाच्या भरांत ते म्हणाले, " हिमांगी–हें नांव मला त्यांनींच ठेवलं–जा इतुत्तर तुला मानवी भाषा कळेल व विद्वानांच्याप्रमाणें बोलताही येईल ! "

" माझा आनंद काय वर्णन करूं योगिराज ? योगिराजांना अभिवादन करायचंही विसरून मी ओवरीच्या बाहेर पडलें– "

" ही गोष्ट गुरुदेव माझ्याजवळ कधींच कसं बोलले नाहींत ? " मुक्तानंद आश्चर्यानें म्हणाला, " अच्छा, सांग हिमांगी पुढं काय झालं ?"

" पुढं काय ? ज्ञानलाभाच्या त्या पिसाट आनंदांत मी पहाडांच्या खड्यांतून वेगांत धांवू लागलें.आश्रमीय ऋषींच्या आसनाशीं जाऊन बसलें. त्यांचे मंत्र मला स्पष्ट समजूं लागलें. बद्रीकेदारच्या आश्रमांत मला माझा प्रियकर भेटला. मला झालेला ज्ञानलाभ मीं त्याला आनंदानें वर्णन करून सांगितला. पण त्या मुर्खाला त्यांतलं एक अक्षरही कळलं नाहीं.मला त्याचा तिटकारा आला. त्याची क्षुद्रता समजली. तो लाडानं शेपटी घासूं लागतांच मीं त्याला खडसावलं, 'जा, मूर्खा, माझ्यावर प्रेम करण्याची तुझी लायकी नाहीं.' तेंही त्याला कळलं नाहीं. शेवटीं नाइलाजानं माझ्या पूर्वीच्या भाषेंत मीं त्याचा धिःकार केला व तेथून निसटलें. पालींपेक्षां मला माणसांचा सहवास आवडूं लागला. समाधिस्थ योग्यांच्या अंगाखांद्यावरून मी स्वैर फिरूं लागलें. आश्रमांतील धान्यकण खावूनच मी जगूं लागलें. विंचू व मच्छर यांच्या हिंसेवर जगणं माझ्या बुद्धीला पटेनासं झालं. आमच्या जमातींतल्या पुष्कळजणी माझ्याकडे आल्या पण ज्ञानाच्या घमेंडींत मीं त्यांच्यांत पुन्हां मिसळण्याचं नाकारलं.

" एकदिवस अशीच बद्रीकेदार मंदिराच्या भिंतीवर मी बसलें होते. माझ्यासमोरच एक संवाद चालला होता...

" चारीधाम यात्रा करून चार महिन्यांत आम्ही गांवीं पोहोचूं !"

" कुठच्या ? "

" माझी राजधानी उत्तर भारतांत आहे. इंद्रापुरी तिचं नांव आहे. तिथला युवराज मी. " त्या उमद्या माणसानें ऐकणाऱ्या योग्याच्या

पायावर मस्तक ठेवलें. योग्यानें आशीर्वाद दिला, " चिरायु भव राजन् ! चारधाम यात्रा पायींच केलीस ? "

" नाहीं योगिराज, आपल्या कृपाशीर्वादानं पालखी आहे... ! " माझ्या डोक्यांत चटकन् एक विचार आला व मी त्या उमद्या माणसाचा पाठलाग केला. आणि एक दिवस त्याच्या पालखीच्या झालरींत बसून मीही उत्तरभारतांत निघालें !

" इंद्रपुरीचं ऐश्वर्य मीं काय वर्णन करावं ? विशाल चंद्रशालांनीं नटलेले उंच उंच प्रासाद, गंगेच्या पात्रासारखे रुंद आणि स्वच्छ राजमार्ग, त्यांतून धांवणारे सुवर्णमंडित रथ, पादचाऱ्यांचे नेत्राल्हादक पोषाख, खिडक्यांतून जनसमर्दाकडे पाहाणाऱ्या पौरांगना, त्यांचे ते काळेभोर डोळे. जणुं आकाशाच्या सागरावर उमललेलीं नीळकमलेंच. जिकडे तिकडे आनंद. पौरजनांचे मुजरे घेत घेत युवराजांची पालखी पुढं पुढं जात होती. एकांतवासाला विटलेले माझे डोळे त्या नगरीच्या श्रीमंत सौंदर्यानं जणूं दिपून गेले होते. रस्त्यांतून जाणाऱ्या येणाऱ्यांतून कितीतरी गंमतींचे संवाद चालले होते. ते संवाद ऐकून व समजून मीं झालरींत आनंदानं नाचत होते. योग्याच्या नीरस संस्कृत मंत्रापेक्षां ती सामुदायिक गडबड अतिशय गोड लागत होती. नगर एवढें सुंदर तर राजप्रासाद किती सुंदर असेल, याची कल्पना करीतच मी पालखी थांबते केव्हां, याची वाट पाहात होते; तों युवराजांनीं भोयांना आज्ञा केली, "मदनिकेच्या प्रासादाकडे अगोदर चला. राजप्रसादांत नंतर भोयी वळले आणि पालखी कुणीकडेतरी जाऊं लागली.

"शुभ्रपाषाणांची एक इमारत दृष्टीस पडली.भोयी तिथें थांबले. मी निरखून पाहात होतें, दरवाजावर सोन्याचे लंगरी खिळे बसविले होते. पालखी ठेवली गेली व युवराज उतरले व लोळत्या उत्तरियाचा सोगा खांद्यावर टाकीत ते दरवाजाकडे वळले. मीही पटकन् उडी मारली व त्यांच्या पाठोपाठ सरपटत पळत जाऊं लागले. दारावर दोन सुंदर स्त्रिया माना वाकवून उभ्या होत्या. त्यांतली मदनिका कोणती, असा विचार

माझ्या मनांत येतो न येतो तोंच त्यांतल्या एकीला स्वत: युवराजांनींच प्रश्न केला, " मदनिका कुठं आहे ?"

" स्नानगृहांत गेल्या आहेत, युवराजांनीं चलावं !"

" जरीचीं पादत्राणं स्फटिकावरून वर चढलीं व त्या पादत्राणांचीं कलाकुसार निरखीतच मीही पण वर आले. किती सुंदर होती ती विश्रांतिशाळा. आम्ही आंत प्रवेश करतांच समोर एक मोठा आरसा होता. त्याची चौकट सोन्याची होती व वर रत्नांनीं नक्षी काढली होती. आरशाच्यासमोर एक उंच चौरंग होता. त्यावर सौंदर्याचीं प्रसाधनें होतीं व दुसऱ्या छोट्या चौरंगावर आसन होतें. युवराज मात्र तिथेंच एका जरतारी लोडाला टेकून बसले व इकडे तिकडे पाहूं लागले. त्यांची नजर टाळून मऊ गालिच्याच्या कडावरून मी आरशापर्यंत आलें व हळूंच आरशाच्या चौकटीवरून पाठीमागें गेलें. मागें चांदीचा पत्रा होता. ही जागा मला बसायला ठीक होती. आरशाच्या पाठीमागें बसून मी मान चौकटीबाहेर काढली.अंवतीभंवती पाहातांना माझ्या मनाला एक गोष्ट मात्र कळून चुकली कीं ही मदनिका राजवराण्यांतलीच निश्चित नव्हे. कारण, तिथल्या बैठकीवर पडलेली वीणा, बीन, सारंगी, जलतरंग हीं उपकरणें-व मृदंगाशेजारीं पडलेले घुंगरांचे पैंजण! निश्चित मदनिका एक वारयोषिता असावी. भिंतीवर काढलेलीं नग्न चित्रें व कामशास्त्रांतील सुरेख आसनें यांनीं तर माझी खात्रीच झाली. एवढ्यांत मदनिकाच बाहेर आली. तिचें लावण्य केवळ अद्वितीय होतें. तिचे डोळे—जणूं नागाच्या फड्याखालीं झगझगणारे नीळमणीच. तिनें हिरवी जरतारी कांचोळी छातीवर परतविली होती, तिचे उन्नत स्तन त्यामुळें अधिकच चढल्यासारखे दिसत होते. तिच्या खांद्यावर उत्तरीय मुळींच नव्हतें. कटीखालती हिरव्याच रंगाचें वस्त्र सळसळत होतें व नाभीपासून निघालेली जरीची एक रुंद पट्टी मात्र गुडघ्याच्या किंचित् खालीपर्यंत पोंचली होती. तिला पाहातांच युवराज चटकन् उठून उभे राहिले. दोघांची दृष्टादृष्ट झाली.

" युवराज "—

" मदनिका !"

"जणूं वीणेच्या स्वरांत मृदंगाचा ताल मिसळला. युवराजांनीं तिला कडकडून मिठी मारली. जणूं कोंवळी वेल वृक्षाला लागली. मदनिकेच्या उघड्या पाठीवर आवळलेले युवराजाचे हात ज्योत्स्नेंतील दीपज्योतींसारखे फिके दिसत होते—मानवांच्या प्रेमाची ती गोड तऱ्हा मला मनापासून आवडली आणि नकळत माझ्या तोंडातून शब्द निघाले, 'धन्य !' माझ्या आवाजानें तीं दोघे चमकून दूर झालीं. मध्यें बोलल्याबद्दल माझाच मला राग आला.

" मोठ्या उद्दाम झाल्या आहेत अलीकडे दासी !" मदनिका रागावून बोलली.

" यांत उद्दामपणा, तो काय मदन ! त्यांनीं आपल्याला 'धन्य' देखील नाहीं का म्हणायचं ?" पुन्हां तिच्या खांद्यावर हात टाकीत युवराज बोलले, आणि नंतर त्यांचीं संभाषणें सुरूं झालीं. मी लक्ष देऊन ऐकूं लागलें.

" कधीं आगमन झालं यात्रेहून ?"

" आत्तांच ! "

" म्हणजे राजप्रसादाकडे गेलांच नाहींत ? " तिच्या भुंवया चढल्या.

" प्रीतिप्रसादाकडे आधीं आलों. मला राहवलं नाहीं मदन ! " किंचित् हंसून तिच्या गालावर युवराजांनीं टिचकी मारली.

" पण घरीं युवराज्ञी ? "

" खरंच तिची आठवण देखील होत नाहीं मला ! "

" च् च् असं नाहीं बोलूं—" मदनिकेनें युवराजांच्या तोंडावर हात ठेवले. त्यांनीं त्याच हातांचें कडकडून चुंबन घेतलें. " मदन, तूंच माझी खरी राणी ! " युवराज म्हणाले,

" मनानं, शरीरानं, सर्वस्वानं ?"—मदनिका उत्तरली.

" मग आपण विवाह करूंया !"

" नको. "

" कां नको ?"—भ्याल्यासारखें करून मदनिका पुटपुटली.

" प्रजेला आवडणार नाहीं तें ! "

" मला प्रजेची पर्वा नाहीं !"

" राज्याची ? "

" त्याहून नाहीं !"

" पण प्रजेची माया मदनिकेइतकीच वेडी आहे. तिला नका लाथाडूं...मी तुमचीच आहे. मला युवराज्ञी पद नको, फक्त आपलं प्रेम पाहिजे !" तीं दोघें पुन्हां एकमेकांना बिलगलीं. केवढा त्याग त्या नर्तिकेचा. मानवांच्याबद्दल मला फारच आदर वाटूं लागला. ती मदनिका तर मला केवळ प्रेमयोगिनी वाटली आणि म्हणून युवराज राजवाड्याकडे निघून गेले तरी मीं माझें आसन त्या विशाल आरशाच्या मागेंच स्थिर करून टाकलें. मानवांतील प्रेमाची तऱ्हा आपल्या जातींत कधीं जाईल याचा विचार माझ्या डोक्यांत जोरानें घोळूं लागला.

"मदनिकेच्या प्रासादांतील माझे दिवस सुखांत जात होते. भक्ष्याला तोटा नव्हता. त्या दोन प्रणयी जिवांची थोर कहाणी एक दिवस दुसऱ्या दिवसाशीं जोडीत होता. त्यांची प्रेमळ आणि काव्यमय संभाषणें ऐकण्यांत मला धन्यता वाटत होती.

"आज मदनिकेकडे कोणीतरी साधु पाहुणा आला होता. कां कुणास ठाऊक. मदनिकेच्या प्रासादांत तो चोरून चोरून वावरत होता. साधू सिद्धांचीं बोलणीं ऐकण्याची मला फारशी आवड नव्हती, पण सांजवेळीं आलेला तो पाहुणा जेव्हां युवराजाप्रमाणेंच मदनिकेला बिलगून बोलूं लागला तेव्हां मला आश्चर्य वाटलें. मानवांची प्रीतिवासना त्यागी व एकनिष्ठ म्हणूनच मला दिव्य वाटत होती.

"हा पाहुणा आल्याबरोबर दासीकरवीं मदनिकेनें राजप्रासादांत निरोप धाडला होता कीं, 'आज मी व्रतस्थ आहे. युवराजांचं पुण्यदर्शन आज मला घेतांच येणार नाहीं ! '

" साधुमहाराजांचीं मदनिकेशीं चाललेली ती लगट आणि सकाळचा तो निरोप यांनीं माझी जिज्ञासा वाढली. आरशाच्या पाठीवरून मी मुद्दाम

खालीं उतरलें. तो साधु अगदींच हलक्या आवाजांत मदनिकेच्या कानाशीं लागून बोलत होता. मी कान देऊन ऐकूं लागलें.

" किती प्रगती झाली ?" साधूनें विचारलें.

"आतां तो माझा दास झालाय् अगदीं. विवाह देखील कर म्हणतोय्!" --मदनिका म्हणाली.

" बघ--भाळशील !" साधू म्हणाला.

" या पायांना जीव वाह्यलाय् एकदां. आपण सिंहासनावर आलांत तर राणी होईन. नाहींतर आपणाबरोबरच मीही अज्ञातवासांतील हाल भोगीन ?"

" मला सिंहासन मिळवून देणं तुझ्या हातांत आहे. हा माझा सावत्र भाऊ नाहींसा झाला कीं महाराजांच्या पश्चात् सिंहासन माझंच आहे. महाराज आणि हा भुरटा युवराज स्वप्नांत आहेत कीं--कीं दासाकडून अरण्यांत सोडलेला व्रतपाल जंगली श्वापदांनीं बारा वर्षांपूर्वींच फाडून खाल्ला...!"

" व्रतपाल जिवंत आहे. आणि सिंहासनाचा वारसही तोच होणार आहे. लाडक्या राणीच्या हट्टासाठीं महाराजांनीं त्याला जंगलांत सोडला पण महाराजानंतर प्रजेचा पालक तोच होणार," मदनिका म्हणाली.

" पण त्याच्या आधीं--!" साधूनें प्रारंभ केला,

" युवराजाला स्वर्गाला धाडला पाहिजे ! " मदनिकेनें वाक्य पूर्ण केलें व निश्चयी स्वरांत ती पुढें म्हणाली, " उद्यांच ही बातमी मिळेल तुम्हांला ! "

" च् च् च् च् च् !" माझ्या तोंडांतून तिरस्कारयुक्त दुःखोद्‌गार निघाला. मानवांच्या स्वभावाची शिसारी आली. मदनिकेचें युवराजावरचें प्रेम जीव--घेणें होतें तर--- ? माझ्या पोटांत गरगरूं लागलें. किळस आली त्या मदनिकेच्या विषारी लावण्याची. ही कैदाशीण युवराजासारख्या राज-बिंड्याला फसवून त्याला ठार मारणार...मला अगदीं थांबवलें नाहीं. नकली साधु आणि त्याची प्रेयसी प्रेमरंगांत रंगली होती. मी मदनिकेच्या प्रासा-

दांतून निसटलें व राजरस्त्याला आलें. सुदैवानें दोन राजदूत राजप्रासादाकडे निघालेलेंच मला भेटले. त्यांच्या पाठोपाठ मी राजप्रासादांत गेलें. ते राजदूत देवडीशीं थांबले. मी आंत गेले. एका मंदिराच्या दाराशीं दोन गायिका कसल्यातरी रागिण्या आळवीत होत्या. त्यांना पाहांताच मला मदनिकेच्या मानभावी सौंदर्याचें स्मरण झालें. युवराजांना भवितव्याची जाणीव द्यायला मी अधीर झालें होतें. एकदां मला वाटलें देखील यांना विचारावें, 'युवराज कुठं आहेत म्हणून ! ' पण हे कोण बोलते आहे म्हणून सारी गडबड व्हायची व माझें काम तिथेंच अडखळायचें. चर्चेचा विषय होऊं नये म्हणून मी आपली वाणी सहसा वापरीत नसे. पण कानांनीं मात्र भाषाज्ञानाचा भरपूर उपभोग घेत असे.

त्या दोघी गायिकांतील एक मध्येंच थांबली व दुसरीला म्हणाली.

" वीणावती, पुरे आतां. झोपले असतील युवराज !"

" अग कुठलं ? युवराजांना प्रासादांत झोंप येत नाहींच. रात्रभर मदनिका, मदनिका करीत असतात !" अगदीं हलक्या आवाजांत वीणावती बोलली. मीं ताडलें कीं युवराजांचें शयनगृह हेंच असावें. गवाक्षाच्या उघड्या दारांतून मी आंत गेलें. आंत मंद समई जळत होती. भिंतीवर खोंचलेल्या नीळमण्यांचा शांत प्रकाशांत मीं शय्येवर तळमळणाऱ्या युवजांना पाहिलें. बाहेर गाणें चाललेंच होतें. युवराजांचें लक्ष त्या गाण्यांत मुळींच नव्हतें. ते या कुशीवरून त्या कुशीवर वळत होते. व जागृतींतच जाबडत होते, ' मदनिका, मदनिका–' बिचाऱ्या युवराजांची मला अगदीं कींव आली. सिद्धसामर्थ्यानं आपणाला प्राप्त झालेल्या मानवी वाणीचा खरा उपयोग करण्याचें मीं ठरविलें व युवराजांच्या उशाशीं; मंचकाच्या स्तंभावर जाऊन बसले. युवराज पुन्हां जाबडले, ' मदनिका, मदनिका'—

" मदनिका ढोंगी आहे. तिचं तुमच्यावरचं प्रेम खोटं आहे. ती तुमचा प्राणघात करील ! " शक्य तितका आवाज मोठा करून मी ओरडलें. युवराज ताडकन उठून बसले व बावरल्यासारखे अवतीं भंवतीं पाहूं लागलें. मी पुन्हां ओरडलें, ' सावधान, सावधान ! तुमचा प्राणघात होणार

आहे ! ' युवराजांनीं मंचकावरून उडी घेतली व घाबरटपणानें ओरडले, ' कोण आहे ? '

"आम्ही आहोंत महाराज !" दारावरच्या त्या दोन गायिका आंत आल्या. त्यांच्या पाठोपाठ आणखी कितीतरी स्त्रीपुरुषसेवक आंत आले. वृद्धप्रासादमंत्रीही बावरत बावरत युवराजाजवळ आले. युवराज वेड्यासारखे डोळे फिरवूं लागले होते— " इथं कोणी बोलत आहे ! भलतंच बोलत आहे. ! "

" कोण ? काय म्हणतं आहे ? " मंत्र्यांनींही खूप घाबरून विचारलें.

" माझा प्राणघात होणार आहे ! " युवराजांचें अंग शहारल्या-सारखें झालें. शयनमंदिरांत जमलेल्या सर्वच नजरा भीतीनें बावरून गेल्या—सेवकांनीं शस्त्रें उपसलीं. प्रासादमंत्र्यांनींही एका रक्षकाची परशू आपल्या हातीं घेतली व अवतीं भंवतीं बावरत दृष्टि टाकीत त्यांनीं गर्जून विचारलें, ' कोण आहे ? ' सेवकजन इकडे तिकडे शोधाधोध करीतच होते. या सर्व अद्‌भुत व अनपेक्षित प्रसंगानें माझ्याही अंगाला कांप सुटला. गैरसमज टाळण्यासाठीं मी शक्य तितका धीर धरून ओरडलें, ' मी पाल आहे ? '

' व्रतपाल ?' पन्नास तोंडांतून एकच आश्चर्योद्‌गार निघाला आणि 'पिशाच्च, पिशाच्च' असा एकच दंगा उठला. जो तो तेथून धांवूं लागला. युवराजांनाही तेथून उचलून नेण्यांत आलें. माझी भीतीनें गाळण उडाली. करायला गेलें एक आणि झालें कांहीं भलतेंच. कशी कुणास ठाऊक कांपऱ्या अंगानेंच मी तिथून बाहेर पळालें. आणि वाट फुटेल तिकडे सरपटूं लागलें. मदनिकेकडे जावें असेंही मला वाटेना. शेवटीं प्रासादाशेजारींच कुठंतरी एका रत्नखचित सिंहासनाखालीं मी थरथर कांपत लपून राहिलें. प्रासादांत रात्रभर गडबड चालू होती. मला वाटतें, पिशाच्चशमनासाठीं मांत्रिक वगैरेही आणले गेले होते. डोळे गच्च मिटून मी तिथेंच बसून राहिले.

रात्र बरीच झाली होती. पुढें काय घडलें वा काय घडणार याचा

विचारही मला करवेना. कसल्यातरी अर्धवट झोपेंत मी त्याच जागीं चिकटून राहिले.'

"आठदहा दिवस मी तिथें, त्या आसनाखालीं तशीच पडून होतें. खावें, हलावें—मला कांहींच करावेसें वाटेना. अंगांतली शक्ति पार नाहींशीं झाली होती. बाहेरचे साद मला ऐकू येत होते. पण कळल्या शब्दांचा अर्थ समजावून घ्यायलाही माझें मन आतां तयार नव्हतें. मी बसलें होतें तो मोठा महाल, रोज कुणीतरी येऊन झाडून स्वच्छ करी धूप घाली व पुन: बंद करून घेई. आडबाजूला असल्यामुळें माझ्यावर कुणाच सेवकाची दृष्टि पडली नसावी.

"पंधरा दिवसांनीं मात्र तो महाल उघडला व गजबजला. दूतांच्या ललकारण्यावरून माझ्या ध्यानीं आलें कीं तें न्यायालय होतें. कांहींतरी बोलणीं चाललीं होतीं. मी अगदींच क्षीण झालें होतें. थोड्या वेळानें सारे आवाज बंद झाले व माझ्यावरील आसनावर कुणीतरी बसल्याचा मला भास झाला. युवराजांच्या पादत्रणासारखींच पादत्राणें माझ्या दृष्टीला पडलीं. माझ्या क्षीण डोळ्यांतही पादत्राणाच्या जरतारी नक्षीचा प्रकाश पडला. प्रकाशांच्या रेखाबरोबरच, दोन तीन मशकेंही माझ्या डोळ्यांत आलीं. मी तोंड उघडलें. तीं तोंडांत शिरलीं. अनायासें भक्ष्य मिळतांच थोडा हुरूप आला व मी जागची हाललें. सिंहासनाच्या पायावरून वर चढत मी समोर दृष्टि टाकली व समोरचें दृश्य पाहतांच मी एकदम कोलमडलें. पाठीला चांगलाच मार बसला. दोन तीनदां सळसळून मी सरळ झालें व मान उंचावून पाहूं लागलें.खालीं मान घातलेली मदनिका न्यायासनासमोर उभी होती. कसलाही आवाज न करतां मी ऐकूं लागलें. झाल्या प्रकारामुळें मला आतां बोलायला नको वाटत होतें. —नाहींतर मी किंचाळलें असतें व मदनिकेवर ओरडलें असतें."मदनिके..." न्यायासनावरून गंभीर शब्द येऊं लागलें. " युवराज पुष्पधन्व्याचा वध तूं विषप्रयोगानें केलास असा या न्यायसभेचा आरोप आहे ! "

" मीं पुन: दचकलें. खूप ओरडण्याची इच्छा झाली. प्राणपणानें मी ती आवरली व ऐकूं लागलें.

" न्यायदेवता, " रडव्या आणि ढोंगी सादांत मदनिका बोलूं लागली—" घडलेला सारा वृत्तांत मी आपल्या कानीं घालते. युवराजांच्या मागें मी जगून तरी काय करणार आहे ? खरें तें ऐका आणि मग सुखे-नैव या दासीला सुळावर द्या अगर अग्नीच्या मुखांत लोटा !"

" मानभावी, दुष्ट ! " मी पुटपुटलें. एका दंडधाऱ्यानें दंड आपटला. अंग चोरून मी सिंहासनाच्या पायाआड गेलें व त्या नीच गणिकेचें खोटें— धादांत खोटें— निवेदन ऐकूं लागलें.

" मदनिका डोळयांत आंसवें आणून सांगत होती, " एकादशी असल्यामुळें मी व्रतस्थ होतें. युवराजांचें पददर्शन त्या दिवशीं मला घडलें नाहीं. शिवाची पूजा आटोपून मी मंचकावर आडवी झालें. झोंप येईना. कधीं उजाडतें व युवराजांचें दर्शन कधीं घडतें असें मला झालें होतें. समया आळसांत मिणमिणत होत्या. माझ्या अंगाला शय्येवरच्या कळया टोचत होत्या, मस्तक तापलें होतें. मस्तकावर दोन्ही हात दाबून मी उघड्या गवाक्षांतून बघत होतें. आभाळांतही वद्यपक्ष होता. पापणीला पापणी भिडली नाहीं. रात्र कलली. पहांट झाली. गार वारा गवाक्षांतून आंत येऊं लागला. क्षमा करा महाराज, मला युवराजांच्या कपोलस्पर्शाचें स्मरण झालें आणि, उत्तेजित मनानें उठून बसलें, एवढ्यांत रथचक्र वाजलें. मी ओळखलें, युवराज आले. अंगावरच्या उत्तरियाचेंही भान विसरून मी खालीं उतरलें. दासी पटापट जाग्या झाल्या. दरवाजा उघडला. युवराजांना भेटायला माझे बाहू अधीर झाले होते. मी पुढें झालें तोंच–हाय रे देवा ! दहापांच सेवकांनीं महाराजांना उचलून आंत आणलें. ते बेसावध होते. व्रतपालाच्या पिशाच्चानें त्यांना झपाटलें होतें !"

" न्यायसभा चित्रासारखी तटस्थ होऊन ऐकत होती. माझें अंग फुटून जातें कीं काय असें मला वाटत होतें. त्वचा तापली होती व आंतडी आंत ताणलीं जात होतीं. मदनिकेनें आपल्या सोंगांत आतां चांगलाच रंग भरला. गालावरून ओघळणाऱ्या खोट्या अश्रूंना अजिबात न पुसतां ती सांगतच होती–" मी आल्याचें कुणीतरी सांगतांच युवरा-जांनीं डोळे उघडले. मला आनंद झाला. सेवक, प्रासादमंत्रि यांना हांकून

काढून मी दरवाजा बंद केला व मानेखालीं हात घालून युवराजांना उठविलें माझ्या स्पर्शानें त्यांना शुद्धि आली. ते उठले आणि माझ्या खांद्याचा आधार घेऊन वर आले. त्यांना हुरूप यावा म्हणून आरशाजवळील चौरंगावर ठेवलेला द्राक्षरसाचा पेला मी त्यांच्या ओंठाला लावला. त्यांनीं चार घुटके घेतले. सबंध पेला रिता कला. थोडेसे हंसले. माझा आनंद गगनांत मावेना. नंतर ते घटकाभर माझ्याशीं बोलले. व्रतपालाच्या पिशाच्चाची कहाणी त्यांनीं मला सांगितली. ती ऐकून मी बावरलें व त्यांना बिलगलें. एवढ्यांत त्यांना पुन्हां भोंवळ आल्यासारखें झालें व एकाएकी डोळे फिरवूं लागले. मीं घाबरून दासींना हांका मारल्या. त्या वर आल्या. वारा घातला, पाणी घातलें पण त्याचा कांहींही परिणाम झाला नाहीं. युवराजांनीं डोळे मिटले ! ''

" मदनिका थोडी थांबली आणि गालावर आलेले आसूंचे ओघळ तिनें पुसून टाकले. माझा तडफडाट झाला. मला जमिनीवर राहावेना. शरीर अग्निकंदुकासारख्या उशा घेऊं लागलें.

" मग त्यांना पिशाच्चाच्या भीतीनेंच मृत्यू आला असें तुला म्हणावयाचें आहे काय ? '' न्यायमूर्तींचा आवाजही घोगरा झाला होता.

" नाहीं महाराज ! ''—आवंढा गिळून मदनिका बोलली, " मी त्यांना द्राक्षरस पाजल्यानंतरच त्यांचें प्राणोत्क्रमण झालें खरें. युवराज वीर होते. भीतीनें त्यांचा अंत होणें कदापि शक्य नाहीं. चौरंगावरचा तो द्राक्षरसाचा पेला उघडा होता. एकाद्या पालीनें त्यांत गरळ ओकली असावी— आणि त्यानेंच—''

"हें ऐकून माझें शरीर जागच्या जागींच एकाद्या चक्रासारखें फिरलें व तडफडतच मी तेथून बाहेर पडलें. प्रासादापासून दूर आल्यावर इतका वेळ कोंडलेली माझी वाणी ओरडली, " खोटें, पालीच्या मुखरसानं माणसं मरत नाहींत. माणसांना मारून पालींना काय लाभ ! मदनिकेनंच युवराजांना मारलें !''

" पण माझें हें भाषण कुणी ऐकलें कीं नाहीं कोण जाणें. माणसें, त्यांचें प्रेम, त्यांची भाषा या सर्वांचाच मला संताप आला. भाषाज्ञानाचें

वरदान माझ्या अंगीं विष झालें. हें ज्ञान नको, हीं माणसें नकोत म्हणून मी नगराबाहेर नदीकांठीं आलें व तिथें वाटावरच्या ओल्या हिरवळींत अंगाचा दाह शमवूं लागलें. थोडेसें थंड वाटल्यावर घटकाभरानें मी वर पाहिलें हलुंहळू सरपटत मी शरीर जाईल तिकडे जाऊं लागलें. मदनिका-युवराज–यांची आठवण सुद्धां मला नको होती.

" संध्याकाळ झाली होती. मार्ग निर्मनुष्य होता. मी पुढें निघालें. आपल्या जातींतलें कुणी तरी भेटेल म्हणून मी रस्त्याच्याकडेच्या एका निर्मनुष्य मंदिराच्या भिंतीवर चढलें. अशोकवृक्षाची गार सांवली अंगावर पडली. जरावेळ तिथें थबकलें. एवढ्यांत खालून माणसांचा चालता आवाज ऐकूं आला. त्या निर्मनुष्य मंदिरांतून मदनिकेकडचा तो साधू व दुसरा कोणीतरी एक बाहेर आले. त्या साधूला पाहातांच माझ्या अंगाचा तडफडाट झाला व उलटी पालटी होऊन मी खालीं पडलें ती त्याच्या अंगावरच. त्यानें अंग झिंजाडलें व दूर होत तो तिरस्कारानें ओरडला, ' पाल— ! '

" पाल अंगावर पडली. वाईट अपशकून तो !" त्याचा साथीदार कडू आवाजांत बोलला. मी पुढचें ऐकायला थांबलें नाहीं. माणूस त्याची भाषा–यांचा संताप आला मला. मी जी तेथून निघालें ते माणसांचा वाराही न घेतां आज एका संवत्सरानंतर कधीं सरपटत तर कधीं वन्य पशूंच्या पाठीचा आधार घेत तेथें आलें.

" महाराज, मानवी भाषा समजण्याचें व बोलण्याचें माझें ज्ञान नष्ट करा. नाहींतर आपल्या टांचेखालीं मला मारून टाका— !" असें म्हणून हिमांगी खरोखरच मुक्तानंदाच्या पायाशीं पडली. मुक्तानंदानें भुवयांची चाळवाचाळव केली व कमंडलूंतील तीर्थ हिमांगीच्या अंगावर टाकीत तो बोलला, ' तथास्तु ! '



आमचे प्रकाशित

## कथासंग्रह

| | | |
|---|---|---|
| १ अमृतकण | : | वि. वि. बोकील |
| २ गोडसोबत | : | वि. वि. बोकील |
| ३ दिवाळसण | : | वि. वि. बोकील |
| ४ अभ्यंगस्नान | : | ना. सी. फडके |
| ५ चंद्रज्योति | : | मालती दांडेकर |
| ६ गुलमोहर | : | शान्ता ज. शेळके |
| ७ पहिलें चुंबन | : | ग. ल. ठोकळ |
| ८ द्वादशी | : | चिं. वि. जोशी |
| ९ सावरकरांच्यागोष्टी | : | बॅ. वि. दा. सावरकर |
| १० भेळ | : | य. गो. जोशी |
| ११ देणें देवाचें | : | मनमोहन |
| १२ झांकलीं माणकें | : | न. अ. दांडेकर |
| १३ माहेर | : | अरविंद गोखले |
| १४ फुलवाली | : | वि. वा. शिरवाडकर |
| १५ कोंकणकथा | : | कृ. के. राहाळकर |
| १६ विखुरलेलें मोतीं | : | शान्ता माडखोलकर |
| १७ लपलेला ओघ | : | ग. दि. माडगूळकर |